## दोन शब्द

या संकलनांत आलेलें लिखाण गेल्या दोन वर्षांत ‘ विविध वृत्त ’ व ‘ नवयुग ’ या साप्ताहिकांतून पूर्वींच प्रसिद्ध झालेलें आहे. वेदाभ्यासजड अशा तात्त्विक वातावरणांतून अस्मादिकांच्या लेखणीला रसमय व साहित्यिक वातावरणांत आणण्याचें श्रेय वरील परस्परविरोधी वृत्तीच्या साप्ताहिकांच्या संपादकांना आहे. एकानें अक्षरशः खोलींत कोंडून ‘ लेखडू ’ देऊन लेख लिहून घेतला, तर दुसऱ्यानें अतिशयोक्तीनें स्तुति करून तेंच घडवून आणलें. तथापि त्यांचें श्रेय सुरवातीचेंच फक्त आहे. लकडा लावून पुढील लिखाण अस्तित्वांत आणण्याचें कार्य ज्येष्ठ चिरंजीवानें केलें !

हे लेख संकलित करून छापावे या अनेक लोकांच्या सूचनेला बळी पडून मीं संमति दिली आहे. जेव्हां केव्हां करमत नसेल, उदासीन वाटत असेल, तेव्हां मागील कांहीं पानें वाचलीं तर मला वाटतें किंचित् समाधान व आनंद वाचकाला खास वाटेल व हें घडत आहे असें मला समजलें, तर मलाही आनंद वाटेल.

नवी दिल्ली,
२९।९।४७

न. वि. गाडगीळ

# अनुक्रमणिका

१

## ' ज्ञानू गेला नव्हं, लहान झालाय् ! '

तुरुंगांत असलेल्या कैद्यांच्या आप्तजनांना भेटणें हें सुटून आलेल्या राजबंद्याचें एक मोठें कर्तव्य असतें. महिनेचे महिने, प्रसंगीं वर्षेंच्या वर्षें एके ठिकाणीं राहिलेल्या माणसांचे स्नेहसंबंध असे निर्माण होतात कीं, त्यांचा परिणाम जीवनावर होत असतो. आणि हा सहवास तुरुंगांत झाला असल्यास त्याचा परिणाम अधिकाधिक जीवनावर होत जातो असें म्हटल्यास गैर नाहीं. दीर्घ तुरुंगवासाचा परिणाम व्यक्तीवर काय होतो हें आज सांगावयाचें नाहीं, तर जेव्हां राजबंदी एकदम न सुटतां

एखादा दुसरा सुटत जातो, त्या वेळीं त्याची वृत्ति काय असते हें पाहावयाचें आहे. गेल्या पंचवीस वर्षांत दहाबारा वेळां तरी तीन प्रांतांतल्या सात तुरुंगांत जाण्याचा प्रसंग आला. अर्थातच तितक्याच वेळां सुटण्याचा प्रसंग आला. जीवन आणि मरण हें एक जसें द्वंद्व आहे, तसें अटक आणि मुक्तता हेंही एक द्वंद्व आहे. जन्मलेला हा मरणारच, तद्वत् अटकेंत असलेला हा सुटणारच, इतका हा सिद्धांत अढळ आहे. मात्र कधीं तरी याचा अर्थ राजबंदीला नक्की अगाऊ कळत असतो असें मात्र नाहीं. एक गोष्ट निश्चित. सुटकेच्या दिवशीं त्याचें मन अनिश्चित असतें. तो आनंदी असला तरी किंचित् भ्रमलेला असतो. अनेक सहबंद्यांना मागें ठेवून जायचें असेल, तर त्याची स्थिति अनुकंपनीयच असते आणि त्या स्थितींत अनेक राजबंद्यांचे निरोप त्यांच्या प्रियजनांना पोहोंचविण्यासाठीं तो घेत असतो.

प्रशांत वातावरणांत

मजबरोबर असलेल्या अनेक तरुण कार्यकर्त्यांनीं आपापल्या प्रियजनांना दिलेल्या निरोपाचें ओझें घेऊनच मी बाहेर पडलों. राजमार्गानें व इतर मार्गानें पत्रव्यवहार चालू असला, तरी सुटून आलेल्या राजबंदींच्या तोंडून आपल्या मुलाची, भावाची, पत्नीची हकीकत ऐकून जवळजवळ भेटीइतकाच आनंद नातेवाइकांना होतो हें अनुभविलेलें सत्य आहे. कालिदासानें म्हटलें आहे कीं, 'कान्तोदन्तः......संगमात् किंचित् न्यूनः' हें सार्थ आहे. प्रियजनांची बातमी प्रियजनभेटीइतकीच आहे. आणि अशा निरोपाच्या अनेक कामगिऱ्या घेऊन मी बाहेर पडलों होतों; परंतु बाहेर आल्यावर ही 'मेघदूती' कामगिरी करण्याऐवजीं प्रांतांत या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जाणें भाग पडलें होतें. विफल व विमनस्क झालेल्या जनतेंत कांहीं तरी उत्साह निर्माण करण्याकरतां

गांधीजींच्या ‘ विधायक कार्यक्रमाचा आवाज ’ निघत होता. आणि त्यांतच बिनवारशी व बिनवाली जणूं जनता आहे असें समजून क्षुद्र अधिकाऱ्यांनीं ठिकठिकाणीं चालू केलेल्या जुलुमजबरदस्तीचा आर्त नाद सारखा येत होता. आणि अशाच कामाच्या संबंधांत सातारा जिल्ह्यांतील प्रशांत रमणीय अशा कृष्णकांठच्या प्रदेशांतून मी प्रवास करीत होतों. कऱ्हाडच्या पुण्यनगरीजवळ व पुण्यक्षेत्रांत कोयनेशीं प्रीति-संगमानें उल्हसित व उत्तेजित झालेली कृष्णा त्या खेड्याजवळून वाहत होती. ज्या वेळीं मीं गांवांत प्रवेश केला, त्या वेळीं रात्रीं दहाचा सुमार होता. आकाशांत चंद्र प्रकाशत होता व नदीकांठच्या झाडींतून, नदीच्या प्रवाहांतून, नदीच्या वाळवंटांत, चांदण्याचें जें विविध स्वरूप दिसत होतें, तें आल्हाददायक होतें. चांदण्यांत मनसोक्त विहार करणाऱ्या या खेड्यांतील रहिवाश्यांच्या मनांत आनंद असेल का, असा प्रश्न सहजच उद्भवला आणि बरोबरच्या कार्यकर्त्याला या खेडयांत काय काय घडलें याची हकीकत विचारली.

## जनतेचें सहजस्फूर्त कार्य

हा माझा वाटाड्या एक सोळा-सतरा वर्षांचा कार्यकर्ता होता. त्यानें मार्क्स वाचला नव्हता, कॉंग्रेसचा इतिहास त्याला अवगत नव्हता, जागतिक प्रश्नावर चालू विचारप्रवाह काय आहेत हें त्याला माहित नव्हतें. चळवळीच्या सुरुवातीस सर्वत्र उठलेल्या वादळांत शालेय आयुष्यांतून तो फेंकला गेला होता. चारपांच मराठी यत्ता झालेला हा लहान, पण पाणीदार वाटाड्या मला बहिर्जीची आठवण करून देत होता. गेल्या दोन वर्षांत आपण कोठें हिंडलों, काय काय कामें केलीं, याच्या नवलकथाच ज्याला म्हणतां येईल अशा रहस्यमय हकीकती तो सांगत असतां माझ्या अंगावर रोमांच उभे राहत होते. मी

म्हणालों, " राघू, तुझें ऐकलें; पण या गांवचें सांग कीं." तो म्हणाला, " मोर्चाचे वेळेस झालेल्या गोळीबारांत या गांवचे सात मेले, किती तरी जखमी झाले, पन्नास पाउणशेंना सजा झाली, दोनशेंवर 'डेटिन्यू' या गांवांतून सरकारनें नेले. आणि अगदीं दोन दिवसांपूर्वी गांवांत पोलिसांची धाड फरारी इसमास शोधण्यास आली होती. गांवावर सरकारनें शिस्त धरली आहे."

" पण गांवांत उंबरा तरी किती ?" मीं विचारलें.

" वाडया-वस्त्या मिळून शंभर आहे." त्यानें उत्तर दिलें. आणि मीं विचार करूं लागलों. या एवढ्या गांवांतून इतक्या लोकांना शिक्षा केली असतां, पकडून नेलें असतां व वारंवार पोलिस धाड येत असतां सुद्धां ज्यांतील लोक हवालदिल झाले नाहींत, असें हें खेडें व त्यांतील लोक, यांना भेटण्याचा योग आला हें पाहून धन्यता वाटली. गांवांत प्रवेश करतांच किती तरी मंडळी वाट पाहत उभी होती. त्यांत नवदा ते अठरापर्यंतच्या मुलांचाच भरणा जास्त होता. त्यांच्याबरोबर मी गांवांत उतरण्याच्या जागीं गेलों आणि तेथें त्या खेडयांतील अनेक लहानमोठे लोक मला भेटून आठ ऑागस्ट नंतर झालेल्या त्यांच्या गांवांतील घटना मला सांगितल्या. नेत्याशिवाय, मार्गदर्शनाशिवाय या लोकांनीं केलेलें सहजस्फूर्त कार्य संपूर्ण अहिंसात्मक तर होतेंच; पण प्रसंगीं उदात्तही होतें. आणि त्याच वृत्तीचा व भावनांचा आविष्कार विधायक कार्यक्रमाच्या द्वारें या खेडयांत व या भागांत दिसून येत होता. मोठ्या प्रमाणांवर गांवांतलीं भांडणें गांवांतील पंचायत भरून मिटविण्यांत येत होतीं. कार्यकर्त्यांच्या संघटनेमुळें सरकारी अधिकाऱ्यांना जशी जरब बसली होती, त्याचप्रमाणें जनतेवर जगणारे गुंड, पुंड व मुखुंड यांनाही जरब बसली होती.

गांवांतील स्वच्छता अधिक वाढली होती. गांवराज्य आम्हीं पुरें करूं असें कार्यकर्ते अभिमानानें बोलत होते. त्यांच्या संघटनेची प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय, या भागांतून पोलिसांचा सारखाच धुमाकूळ चालला होता. माझ्या मनांत सहज विचार आला कीं, हे लोक कुठवर टिकतील ?

मान वांकेल, पण—

वीस वर्षें धुमाकूळ घालून जो प्रदेश औरंगजेबाला जिंकतां आला नाहीं, तो हा प्रदेश कृष्णा व गोदावरीमधल्या दुआबांतील प्रदेशाचा भाग होता. ज्यांनीं महाराष्ट्रांतून कर्नाटकांत जिंजीला राजधानी हालवून वीस वर्षें स्वातंत्र्यासाठीं अखंड झगडा केला, त्या जिद्दीखोर मराठ्यांचे वंशज हाल-अपेष्टांना टिकणार नाहींत हें कसें ? ' जेथें शत्रु तेथें त्यांचें राज्य ' हा अनुभव औरंगजेबाचा होता, स्वातंत्र्यासाठीं मरणाचें मोल देणाऱ्या, देशासाठीं फकिरी स्वीकारणाऱ्या लोकांचा हाच अनुभव आहे. दडपशाहीनें मान वांकेल, अभिमान वांकणार नाहीं ! बेड्यांनीं हात बांधले जातील, पण आशा कशी जखडली जाईल ! नागरिक स्वातंत्र्यें मारलीं म्हणजे त्याबद्दलची तीव्रता अधिकच वाढते. चौकाचौकांतली चळवळ दडपशाहीमुळें तळघरांत व रानावनांत जाते. भूमिमान् भूमिगत होतात. ज्याच्या त्याच्या तोंडीं विषय झालेला अज्ञात होतो. सर्वत्र हिंडणारा फरारी समजला जातो. झाडें बोलूं लागतात. मनुष्यांचें मौन अधिक सार्थ होतें. मुंगी मुंगीला भेटते व ठराव न करतां, आवाज न काढतां साखर कोठें आहे ती जशी सांगत जाते, तशी ही स्वातंत्र्याची शीळ रानावनांतून 'ऐकणाऱ्या'ला ऐकूं जाते ! संदेशवाहकाचें काम जड आणि जीवमान दोन्ही करीत असतात. एतद्विषयक अनेक आठवणी अनेक राष्ट्रांच्या इतिहासांतून वाचलेल्या,

डोळ्यांपुढून जात होत्या; व इतिहासाची नियती चुकणार नाहीं असा विश्वास मनांत मूळ धरूं लागत होता.

### काय सांत्वन करणार ?

एवढयांत "रामजीबुवाकडे गेलें पाहिजे" अशी आज्ञा माझ्या वाटाड्यानें मला केली. "कोण रामजीबुवा ?" म्हणून मीं प्रश्न केला. त्यानें सांगितलें, "रामजीबुवा म्हणजे आमच्या गांवचे एक सुतार आहेत. फारां वर्षांनीं झालेला त्यांचा एकुलता एक मुलगा 'ज्ञानू' मोर्चाच्या गोळीबारांत मेला, तेव्हां त्यांना आपण भेटावं अशी विनंती आहे." मीं ताबडतोब ती मान्य केली आणि आम्हीं दोघे गांवच्या खालच्या बाजूस पांचदहा मिनिटांत एका बऱ्यापैकीं घरांत प्रवेश केला. तुरुंगांतून निघतांना ज्या तऱ्हेचे निरोप सांगण्याचें ओझें माझ्यावर होतें, त्यापेक्षां निराळा हा प्रसंग होता. वार्धक्यांत एकुलत्या एक पुत्राला आंचवलेल्या एका गृहस्थाला मला भेटावयाचें होतें. मी त्यास काय सांगावें याचा विचार करूं लागलों. कोणत्या भाषेंत, कोणत्या शब्दांत त्याचें सांत्वन करावें, याचा निर्णय लागेना. ज्यानें आपल्या उमेदींत गांवांतील अनेकांचीं घरें उभारलीं असतील, त्याचें उभें घर दैवानें पाडलें होतें. हा विश्वकर्मा–( कारण सुताराला विश्वकर्मा म्हणतात )–परास्त झाला होता. वाकसानें ओबडधोबड लांकूड छेलून-काटून प्रथम तयार करावें व लांकडाला झालेलें दुःख बारीक रंध्यानें रंधून गुळगुळीत करून जसें सांत्वन करावें, तसेंच थोडेंसें दैवानें त्याच्या बाबतींत केलें होतें. म्हणजे गोळीबारांत मुलाचा मृत्यु झाल्यानंतर एकदोन महिन्यांत त्याला नातू झाला होता.

### ज्ञानू लहान झालाय् !

पडवीवर अंथरलेल्या घोंगडीवर म्हातारबुवा बसले होते. शेजारीं

दोन-तीन गृहस्थ बसले होते. मीं जातांच त्यास अभिवादन केलें व नको म्हणत असतां म्हाताऱ्यानें माझ्या पायावर डोकें ठेविलें. काय बोलावें तें मला सुचेचना. सर्व वक्तृत्व अर्धांगवायु झाल्याप्रमाणें लुलें पडलें. प्रतिभा गोठून गेली, संकटकाळीं मित्र निसटून जावेत, त्या-प्रमाणें शब्द जिव्हेला सोडून गेले. कसाबसा प्रयत्न करून मी म्हणालों, " बाबा, ज्ञानू मोठा भाग्याचा. असलें मरण मागून मिळत नाहीं. " माझें बोलणें संपतें न संपतें तोंच म्हाताऱ्यानें जवळ बसलेल्या दोन वर्षांच्या नातवाला अधिक जवळ केलें व म्हणाला, " नव्हं, नव्हं, ज्ञानू गेला नव्हं. ज्ञानू लहान झालाय् ! " आणि असें म्हणून त्या लहान अर्भकाला माझ्या पायावर घातलें. मी अधिकच गोंधळून गेलों, ' ज्ञानू गेला नाहीं. ज्ञानू लहान झाला आहे. ' याचा संपूर्ण अर्थ जेव्हां माझ्या लक्षांत आला, तेव्हां मला धन्य वाटलें. जें आत्मज्ञान प्रवचनानें लाभत नसतें, नुसत्या बहुश्रुततेनें येत नसतें, तें या वृद्ध गृहस्थाला कसें झालें ? ज्ञानू मेला नाहीं, तो अमर आहे, हें तत्त्वज्ञान या निरक्षरानें कसें जाणलें ? आत्म्याचें अमरत्व मानवी जीवन अखंड राहण्यांत कसें आहे हें त्यानें कसें ओळखलें ? ' आत्मा वै पुत्रनामासि ' हें वेदान्तांतील रहस्य हा कोठें शिकला ? दुःखी घटनांतून स्फूर्तिदायक अर्थ काढून उन्नत समाधान यास कसें लाभलें ? 'ज्ञानू लहान झालाय्' या वाक्यानें आशेचें व प्रयत्नाचें अमरत्व इतकें नितान्तसुंदर रीतीनें दाखविण्यास कोणत्या साहित्यिकानें त्याला शिकविलें ?

### पौर्वात्य संस्कृतीची मूर्ति

स्वातंत्र्याचा प्रयत्न किंबहुना कोणचाही श्रेष्ठ आदर्श हस्तगत कर-ण्याचा प्रयत्न बिनवारसी मरत नाहीं, हेंच त्यानें सांगितलें नाहीं का ? ज्योतींतून ज्योत लावल्यानंतर दोन्हींतील प्रकाशांत फरक कसा राहील ?

उलट, ' अधिक ज्योति म्हणजे अधिक प्रकाश ' असाच त्याचा अर्थ आहे. नवीन पिढी म्हणजे प्रयत्नासाठीं अधिक काळ, अधिक क्षेत्र व अधिक आशा. मृत्यु म्हणजे एक यःकश्चित् गोष्ट, एक क्षुद्र घटना ज्यानें मानली, ज्यानें मृत्यु म्हणजे एक अनित्य भाव समजून नित्य व निरंतर भाव म्हणजे जीवन, जीवन म्हणजे आशा, असें एका साध्या वाक्यांत सांगितलें, तोच खरा समदर्शी नव्हे का? स्थितप्रज्ञाची कोणती भाषा, स्थितप्रज्ञ काय खातो, कसा राहतो, कसा बोलतो याचें नित्य विवेचन आमच्यापैकीं अनेक अहर्निश करीत असतात. पण, तो आज मला प्रत्यक्ष आढळला आणि ज्या समाजांत असा एक आहे, तो समाज धन्य आहे, त्याचें भवितव्य श्रेष्ठ आहे! खरी उपनिषदांतील संस्कृति सदेहानें माझ्यासमोर उभी होती. पौर्वात्य संस्कृतीचें हें मूर्तिमंत दृश्य होतें आणि असे अनंत विचार माझ्या मनांत चालत असतां सभेची वेळ झाली म्हणून माझ्या तरुण कार्यकर्त्यानें त्या दिव्य अवस्थेंतून मला जागें केलें. रामजीबुवांच्या पायावर अक्षरशः मस्तक ठेवून मी बाहेर पडलों. माझ्या डोक्यांत ' ज्ञानू गेला नव्हं, लहान झालाय् ' हें अमर वाक्य सारखें घोळत होतें आणि आजही तें लिहितांना पुनः पुनः प्रथम ऐकल्या वेळचा आनंद सारखा उसळून येत आहे आणि या लेखानें त्यांतील एक अंश जरी वाचकांना मी पोंचवूं शकलों, तरी मला मोठी कमाई मिळाली असें मी समजेन.

२

## डिकसाळच्या धुळींत–

"सेकंड क्लासचें तिकिट नाहीं व इंटरचेंही नाहीं." हे तिकिट मास्तरचे शब्द ऐकतांच "बिचारे लोक निराश होतील." असे शब्द माझ्या तोंडून सहज निघाले व ते तिकिटमास्तरनें ऐकले. काय झालें असेल तें असो; त्यानें मला पुनः खिडकीजवळ बोलाविलें व म्हणाला, "माफ करा, एखादें इंटरचें तिकिट आहे असें वाटतें. पांचदहा मिनिटांत सांगतों." मी खांद्यावर अलीकडे प्रतिष्ठा पावलेली झोळी घेऊन पुणें स्टेशनच्या दुसऱ्या वर्गाच्या तिकिट ऑफिससमोर

परीक्षेच्या निकालासाठीं वाट पाहणाऱ्या विद्यार्थ्याप्रमाणें उभा राहिलों. मला अकलूज येथें नवीन पद्धतीनें होणाऱ्या लग्नासाठीं 'अध्यक्ष' म्हणून जावयाचें होतें. रात्रीची मेल ही एकच सोयीची गाडी होती व तिला डिकसाळचें तिकिट मिळत नव्हतें म्हणून शंभर मैलांपुढील कुर्डु-वाडीचें तिकिट मिळविण्याचा प्रयत्न करणें भाग पडलें. समाजांतील विषमतेप्रमाणें प्रवासांतील वर्गवारी व विषमता हल्लीं तर अधिकच असह्य झाली आहे. तिसऱ्या वर्गाचें तिकिट मिळणें अशक्य झालें म्हणून वरच्या वर्गाचें तिकिट घेण्यासाठीं प्रयत्न करीत असतां वरील-प्रमाणें घडून आलें.

तिकिट मास्तरची कहाणी

कित्येक तुरुंगांतून आलेल्या कार्यकर्त्यांनीं ग्रामसुधारणेच्या दृष्टीनें खेड्यांत प्रवेश करून घेतला आहे. अनेक ठिकाणीं त्यांनीं नवीन पद्धतीनें लग्नें लावण्याचा उपक्रमही सुरू केला आहे ! अशाच एका विवाहाचें पुरोहितपण एकही मंत्र व विधि न जाणणाऱ्या वेदोनारायणा-कडे आलें होतें व हें कार्य करण्याकरतां तिकिटाकरतां धडपड चालली होती. त्या पांच मिनिटांत अनेक विचार मनांतून जात होते. न गेलों तर काय होईल. लोकांची किती निराशा होईल, गेलों तर 'जनता-संबंध' अधिक वाढतील, ग्रामीण जीवनाचा थोडा अनुभव येईल, कांहीं जनसेवा केल्याचा मनाला संतोष वाटेल. विचार-मालिका चालू असतां सोलापूरची कांहीं मंडळी तिकिटाच्या आशेनें तेथें आली व नामोच्चारानें त्यांनीं मला हांक मारल्यामुळें साहजिकच त्याचा परिणाम तिकिट मास्तरवर झालेला दिसला व त्यानें मला तावडतोब बोलावून इंटरचें तिकिट दिलें. ह्या त्याच्या चांगुलपणाबद्दल मला थोडी किंमत द्यावी लागली आणि ती म्हणजे दहा मिनिटेंपर्यंत त्यानें आपल्या नोकरींतील गाऱ्हाणीं सांगितलीं. २३ वर्षें आपण तळ-

हातावर शिर घेऊन अनेक ए. टी. एस्. आणि डी. टी. एस्.—( ज्याचा अर्थ मला मुळींच कळत नाहीं )—यांच्याशीं कसे लढलों हेंही निवेदन केलें. आपला भाऊ एम्. ए. असूनसुद्धां तो बेकार आहे व आपण नॉन मॅट्रिक असून पुण्यांतील एका उपनगरांत बंगला बांधून आहोंत हेंही सांगितलें. आपलीं मुलें या ४२ च्या चळवळींत कशीं ऐकेनाशीं झालीं याचीही तक्रार केली. मला वाटूं लागलें कीं, आतां हा आपल्या आत्मचरित्राचें महाभारत गाणार ! यांतून सुटण्याचा मार्ग मी शोधत होतों; तेवढ्यांत लढाईवर जाणाऱ्या सैनिकांची गडबड सुरू झाली व त्याचा फायदा घेऊन मीं निघालों. तिकिटाची प्राप्ति व तीही एक पैसाही जास्त न खर्चतां, हा आनंद पुत्रजन्मोत्सवाइतकाच मानला पाहिजे.

अखेर गाडी आली !

गाडी येण्यास अद्याप दीड तास होता. तेवढ्यांत तिकिट-ऑफिस-जवळ दिसलेले सर्व चेहरे पुनः प्लॅटफॉर्मवर दिसूं लागले. जादूगाराच्या टोपींतून ज्याप्रमाणें वस्तु निघाव्यात, त्याप्रमाणें शिल्लक नसतांही तिकिटें अनेकांना मिळालीं हें पाहून थोडा आनंद व थोडें वाईटही वाटलें. हे सगळे एकूण गर्दी करणार हें कळून चुकलें. गाडीची मार्गप्रतीक्षा कर-ण्यांत १॥ तास घालवल्यावर एकदांची मेल आली. हमालानें तुम्ही आंत शिरा, तुमची ट्रंक मी देतों, त्याची काळजी नको, असें आश्वासन दिलें आणि गाडी उभी राहतांच उतरणारे व चढणारे यांचें द्वंद्व सुरू झालें. जी गोष्ट पद्धतीनें केली असतां, दोन मिनिटांत संपली असती ती दहा मिनिटांत झाली नाहीं. मी तर रावणाच्या दरबारांत ज्याप्रमाणें अंगदानें गवाक्ष द्वारानें प्रवेश केला, त्याप्रमाणें प्रवेश करून गर्दीत उताखंच्या मांडीवर आदळला गेलों. माझ्या ह्या पराक्रमानें आस-

पासच्या चारपांच मंडळींना त्रास निश्चित झाला असला पाहिजे व कदाचित त्यांनीं मजवर हल्लाही केला असता. परंतु सर्व खिडक्या प्रवेशद्वारें झाल्यामुळें व ही नित्याची बाब झाली असल्यामुळें विशेष तक्रार केली नाहीं. सोडावॉटरच्या पेटाऱ्यांत बाटल्या गच्च भराव्यात त्याप्रमाणें ३६ माणसांकरतां केलेल्या डब्यांत ७० च्या वर माणसें झालीं होतीं. ज्यांना प्रवेश मिळाला होता, ते आंतल्यांशीं एकजूट करून नवीन येणाऱ्याविरुद्ध भांडत होते. गाडी चालू होतांच, पाण्यांत सूर मारावा त्याप्रमाणें एका तरुण व्यापाऱ्यानें सूर मारून प्रवेश केलाच. त्याच्याविरुद्ध भांडावें का कौतुक करावें, याचा निकाल होण्यापूर्वीच गाडी वेगांत आली व आंतील जनगंगा स्तब्ध झाली.

## डब्यांतील युद्ध

तथापि, या क्षणभर प्रशांत झालेल्या वातावरणामागील खळबळ जमून येत होती. गाडींत वर सामान ठेवण्याच्या जागेवर अनेक इसम निजले होते. दोन्ही बाकांच्यामध्यें दरवाजासमोर अस्ताव्यस्त सामान व धरणीकंप झाल्यावर अस्ताव्यस्त दिसावेत असे उतारू वांकडे तिकडे बसलेले, कांहीं उभे असलेले असे दिसत होते. कांहींना उभे राहण्यासाठीं जागा नव्हती; त्यांपैकीं बरेच सैनिक होते. एकानें वर निजलेल्या सद्गृहस्थाला हलवून जागा देण्यास सांगितलें. सदहू गृहस्थ मद्रासी होता, त्यानें ती जागा बसण्यासाठीं नाहीं, निजण्यासाठीं आहे, म्हणून उत्तर दिलें. सैनिकानें डब्याला युद्ध-क्षेत्र बनवून वरचा शत्रु खालीं ओढला. मद्रासी उतारूनें डब्यांत असलेल्या तिकिट-चेकरला मारहाण केल्याबद्दल ओरडून सांगितलें. चेकरनें मद्राश्याचा आकार पाहून विश्वास बसत नाहीं असें मार्मिक उत्तर दिलें व डब्यांत हास्य उधळलें व सैनिकानें कारकुनावर मात करून जागा मिळविली. मी मात्र अद्यापि व्यासाप्रमाणें दोन्ही हात वर

करून वरच्या पट्टीला धरून उभाच होतों. माझें बोलणें कोणी ऐकतील असा भरंवसा नसल्यानें मी बोलत नव्हतों व श्लोकार्धात सर्व धर्म सांगण्याची संधि मला मिळाली नव्हती. या सर्व आपत्तींचें मूळ परकी सत्ता आहे हें सांगण्याला सवडच नव्हती. तथापि, मला त्या स्थितींत पाहणारे अनेक होते व प्रसिद्धि व पुढारीपणा यांचा फायदा मात्र लवकरच मिळाला आणि तो असा :

## किती झालं तरी मारवाडीच !

माझ्याचबरोबर पुण्यांत एका काळीं काँग्रेसमध्यें कार्य करणारे पण धंद्यानें व्यापारी असल्यामुळें सुराज्यापेक्षां संपत्ति अधिक श्रेष्ठ असा त्यांचा विश्वास असल्यामुळें धंद्यांत संपूर्णपणें निमग्न झालेले असे एक सद्गृहस्थ गाडींत होते. त्याचप्रमाणें डब्यांतील कोपऱ्यांत, मुंबईपासून बसलेल्या उतारूंत मला ओळखणारे एक गृहस्थ होते व त्यांनीं नांवानें हांक मारून त्यांच्या कबज्यांत असलेल्या जागेपैकीं ऐसपैस जागा मला दिली. आम्ही तिथे बसल्यानंतर युद्धाच्या व चळवळीच्या गप्पा चालू असतांच, डब्यांत असलेल्या मारवाडी गृहस्थाची नवलकथा ऐकावी लागली. तिकिट-चेकर सदहू गृहस्थाजवळ तिकिट नाहीं म्हणून कुर्डुवाडीपर्यंतचे दुप्पट पैसे मागत होता. मारवाडी गृहस्थाचें म्हणणें असें कीं, ' आम्ही दोघे भाऊ, एक मुंबईस व एक कुर्डुवाडीस जाण्यास निघालों व घाईंत तिकिटांची अदलाबदल होऊन मुंबईचें तिकिट कुर्डुवाडीचे उतारूजवळ आलें. तिकिट काढलें होतें व असलेलें तिकिट सदहू गृहस्थाचें म्हणणें सत्य दर्शवीत होतें. सदहू गृहस्थाजवळ पुरेसे पैसे नव्हते व होते ते देण्यास तो तयार होता. त्याला जाण्याची निकड होती. दौंडपर्यंत पुरेसे पैसे न दिल्यास पोलिसचे ताब्यांत देण्याचा धाक दिला. कुर्डुवाडीस पोहोंचतांच पैसे देतों असें सदहू गृहस्थानें ओळखून

सांगितलें. मीं मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला; पण न्याय व कायदा यांतील फरक कळणें तिकिट-चेकरच्या अकलेच्या पलीकडचें होतें. आणि माझ्या मध्यस्थीचें बक्षिस मारवाडी गृहस्थानें कमी पडणाऱ्या पैशांची मागणी माझ्याकडे करून मला दिलें ! मीं ताबडतोब ती रक्कम दिली. सदहू गृहस्थाचें नांव व पत्ताही विचारला नाहीं. आणि ज्या वेळीं डिकसाळला उतरलों त्या वेळींही विचारला नाहीं. कारण देणारा इसम देईलच, न देणारा नाहीं, शिवाय आपल्याजवळ असलेली संपत्ति ही ठेव आहे या गांधींच्या सिद्धांताप्रमाणें चालण्याची संधि मला मिळाली असल्यामुळें त्याच आनंदांत कदाचित् मी असेन !

नमूद करण्यास आनंद वाटतो कीं, त्या घटनेनंतर तीन आठवड्यांनीं ती रक्कम मनि-ऑर्डरनें आली. तथापि घरच्या फडणिसानें झालेल्या घटनेबद्दल भोळेपणाचा छाप मारण्यास कमी केलें नाहीं !

### म्युनिसिपालिटीची 'सुव्यवस्था'

डिकसाळ स्टेशनवर एकच दिवा होता आणि तोही प्रकाश देण्या-ऐवजीं भोंवतालचा अंधार अधिक स्पष्ट करीत होता. प्लॅटफॉर्मवर व्यवस्थेसाठीं पाठविलेला स्वयंसेवक उभा होता. रात्रीचे ३ वाजले होते. अकलूजची मोटर सुटण्यास तीन तास अवधि होता असें कळलें. स्टेशनमास्तरकडे चौकशी करतां दुसऱ्या वर्गासाठीं थांबण्याची सोय नव्हती. तिसऱ्या वर्गाच्या जागेंत अंधारांत अनेक लोक निजले होते.

स्टेशनवरील बांकावर उरलेली रात्र काढावी असें स्टेशनमास्तरनें आग्रहानें सुचविलें; पण स्वयंसेवकानें मोटरस्टॅन्डजवळ उत्तम व्यवस्था आहे असें सांगितलें म्हणून आम्ही दोघे स्टेशनच्या आवाराबाहेरील स्टॅन्डजवळ आलों.

## चांदण्यांतील क्रांतिकारक विचार !

थंडी मी म्हणत होती. आकाशांत शुक्ल पक्षांतील चंद्रमा, अन्य वेळीं आल्हाद देणारा, थंडीला अधिक थंड करीत होता. आसपास लष्करी मोटरगाड्या हत्तीच्या धुडाप्रमाणें दिसत होत्या. स्टॅन्डची जागा म्हणजे रस्त्याच्या बाजूस असलेली मोकळी जागा होती. तेथें दोन गाड्या उभ्या होत्या. उरलेली रात्र मोटरगाडींत विश्रांति घेऊन काढतां येईल या भरंवशावर स्वयंसेवक होता; पण आमच्याबरोबर अनेक स्त्री-पुरुष उतारू होते व तेही त्याच हेतूनें मोटरीकडे येत होते. या स्थितींत मोटरींत बसण्यापेक्षां बाहेर चांदण्यांत रात्र काढावी असा मीं निश्चय केला. किंबहुना तसें करणें भाग पडलें असें म्हटलें तरी चालेल. थोड्या अंतरावर एका प्रख्यात भांडवलवाल्या कंपनीचें 'गेस्ट-हाउस' होतें व तेथें गेलों असतों तर सोयही झाली असती; पण सोयीच्या पुढें अभिमान हार खाण्यास तयार नव्हता. आणि म्हणून उरलेली रात्र अक्षरशः धुळींत काढावी लागली. मजबरोबर उतरलेले अनेक उतारू होते, त्यांनीं ताबडतोब धुळीमध्यें आपापल्या घोंगड्या पसरून सुरुवातही केली होती. आणि मी काय करावें याचा अद्यापि विचारच करीत होतों. झोंप मी म्हणत होती; पण धुळींत अंथरुण पसरून निजण्यास मन तयार नव्हतें. वेळीं-अवेळीं वाटेल त्या स्वरांत व सुरांत मातृभूमीचें गीत गाणारा मीं मायभूमीच्या अंकावर पहुडण्यास राजी नव्हतों. आणि मी विचार करूं लागलों कीं, माझ्या शेजारीं घोंगडीवर पडतांच निद्रिस्त झालेल्या लोकांच्या मनांत माझ्यासारखे विचार आले का व आले नसल्यास कां आले नाहींत ? ज्यांच्या श्रमावर सर्व जग चरत आहे त्यांना सुखाचा बारीकसा वांटा येऊं नये हें कसें ? प्रवासाचीं सुखसाधनें विवक्षित लोकासाठींच कां ? आणि त्याचबरोबर ही विषमता इतकी तीव्र असतांनासुद्धां तिची जाणीव बहुजनसमाजांत कां होत

नाहीं ? एकानें खपावें आणि दुसऱ्यानें खावें हा कोठला न्याय ? ज्या समाजव्यवस्थेंत हा अन्याय राहूं शकतो ती कां टिकावी ? आणि अनेक ठिकाणीं 'दादा, आमच्या दैवांतच कष्ट आहेत' असें म्हणणाऱ्या अनेक शेतकऱ्यांच्या आठवणी डोळयांपुढें आल्या. सामाजिक अन्यायाला दैवाचा हवाला देऊन संपत्तिमान व संचितवादी वर्गानें आपलें कार्य साधलें आहे.

ही परकी सत्ता बरं !

भोंवतालचे उतारू नुसते धुळींतच पडले होते असें नव्हे, तर थंडीनेंही कुडकुडत होते. पाठीवर सूर्य, पोटाशीं गुडघे व दोन्ही वेळां कृश मुख असें दरिद्री जनांचें संस्कृत कवीनें केलेलें वर्णन आठवलें. थंडी कशी काढली याचें उत्तर 'जानुभानुकृशानुभिः' असेंच हिंदु बहुसंख्यांक जनतेला द्यावें लागेल. 'सुजलाम् सुफलाम् सस्यशामला' अशा वंगभूमींत ३५ लाख लोक अन्नान्न करून मेले आणि एके काळीं सर्व जगाला मोठ्या प्रमाणांत वस्त्र पुरवणाऱ्या भारत देशांत आज लज्जासंरक्षणाइतकासुद्धां कपडा मिळत नाहीं हाही विचार मनांत येऊन गेला आणि या सर्व आपत्तीचें मूळ परकी सत्ता ! मन हें अधिक व्यग्र होऊं लागलें. परकी सत्ता हें तर कारण खरेंच, पण त्याचबरोबर ज्यांनीं ज्ञान देऊन जनतेला जागृत करावयास पाहिजे त्यांची कर्तव्यच्युति हेंही एक मोठें कारण आहे. बहुजनसमाज हा भोळाशंकर आहे; पण त्याचा तृतीय ज्ञाननेत्र जर उघडला, तर जगांत प्रलय होईल. पण, प्रलयानंतर नवनिर्मितिही होईल.

मोटरवाला नरमला !

आणि याप्रमाणें धुळींत बसून विचारमालिका चालू असतांच शेजाऱ्या हॉटेलांतून 'चहा कोणास पाहिजे ?' म्हणून आवाज आला आणि

त्या ठिकाणीं मी गेलों. या भागांत साखरेचे कारखाने आहेत, पण गुळाचा चहा पुढें आला! खरेंच आहे, जेथें पिकतें तेथें विकत नाहीं हें निराळ्या दृष्टीनें अनुभवास आलें. ६ वाजले होते व गाडी सुटण्याची वेळ झाली म्हणून आम्ही गाडींत बसलों. मोटर एजंटानें शिरस्त्या-प्रमाणें अद्वातद्वा बोलून मेंढरांप्रमाणें उतारूंची भरती करण्यास सुरुवात केली. गरीब बिचारे उतारू निकडीमुळें निमूटपणें ऐकत होते आणि मग मला स्वस्थ बसवेना. जास्त उतारू भरल्यास मोटर जाऊं देणार नाहीं असें मीं ताबडतोब बजावलें व त्यानेंही असे खादी टोपीवाले पुष्कळ पाहिले म्हणून उत्तर दिलें; पण 'माझ्यासारखा तुला दिसणार नाहीं. एक तर रात्रभर उतारूंना धुळींत ठेवलेंस, त्यांची सोय केली नाहींस व शिवाय गैरकायदा व गैरशिस्त वागतोस हें चालूं देणार नाहीं' असें मी म्हणालों आणि त्याचा परिणाम सर्व उतारू स्वाभिमानानें माझ्या बाजूस येऊन त्याला विरोध करूं लागले. आणि शेवटीं मोटर ड्रायव्हरानें जेव्हां आंतील दिवा लावून मला नीट न्याहाळून पाहिलें त्याबरोबर एजंटच्या कानाशीं लागून त्यानें मुकाट्यानें मोटर सुरू केली.

धुळींतील सुवर्णरज

अंधार हळूहळू नाहींसा होत होता व सूर्य हळूहळू वर येत होता, आणि त्याचबरोबर जर जनतेंतील अंधार व अज्ञान नाहींसें होईल, तर उन्नतीचा सूर्योदय झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी सुंदर उपमा मनांत आली. धुळींत तीन तास मी बसलों नसतों व स्टेशनमास्तरच्या सांगण्याप्रमाणें बांकावर निजून रात्र काढली असती, तर जे सुंदर विचार सुचले ते सुचलेही नसते. या धुळींत खरोखरच माझ्या मनाला सुवर्णरज मिळाले आणि खरोखरच ही मातृभूमि सुवर्णाची खाण आहे, याचा साक्षात्कार निराळ्या दृष्टीनें मला झाला. आनंदांत वांटेकरी होण्यानें आनंद द्विगुणित होतो म्हणूनच हें रेखाटलें आहे.

३

## अवंतिकां प्राप !

बरोबर दोन तपांनीं मीं इंदूरला जात होतों. दिल्ली–सिमल्यास जातांना अनेक वेळां रतलामवरून जाई व येई; व अनेक वेळां पुन्हां एकदां इंदूर, निमच या स्थळांना भेटी देऊन स्मृति उजळाव्या असें वाटे; पण तें घडलें नाहीं. एक तर दिल्लींत आपल्यावांचून पक्षाचें अडेल अशी भीति व पुण्यांत आपल्याशिवाय कोण आहे असा अभिमान. चाकावरल्या माशीला आपल्यामुळेंच चाक फिरतें असें वाटतें याच रंगाचा हा अभिमान होता ! तथापि, एवढी गोष्ट खरी कीं, १९२० सालानंतर

म्हणजे आमच्या ब्रह्मचारी संघांतील शेवटच्या सभासदाची ' विकेट ' पडल्यानंतर मी या भागांत गेलों नाहीं. तसा हिंदुस्थान हा मायदेश असला तरी माझा प्रत्यक्ष जन्म मेवाड व माळवा यांची सरहद्द होऊन बसलेल्या चंबळा नदीच्या कांठीं मल्हारगड या ठिकाणीं झाला होता. म्हणून या प्रदेशाबद्दल मला आपुलकी वाटते व तिजबद्दल असलेला अभिमान किंचित् सकुंचित दिसला, तरी सार्थ आहे असें मला वाटतें. माळवा म्हणजे हिंदुस्थानचें धान्य-कोठार समजलें जातें; व मेवाड म्हणजे वीरभूमि आहे आणि अशा स्थळाचा कोण अभिमान धरणार नाहीं ? चंबळा नदीजवळ एक बारी आहे व त्या बारींतूनच मेवाडमध्यें जावें लागतें आणि या भागांत ' दख्खनकी कमाई, और हरकियामें गमाई ' अशी म्हण प्रचलित आहे. या हरकियाच्या बारींतून दक्षिणेंत मुबलक पैसा मिळवून आलेले मारवाडी मारवाडकडे जात असत. आणि जातांना बहुसंख्यांक मारवाड्यांना लुटारूंच्या भक्ष्यस्थानीं पडावें लागे. हा मनु आतां पालटला आहे. तथापि, ही ऐतिहासिक परंपरा अजिबात नष्ट झाली आहे असें सरकारी रिपोर्टावरून दिसून येत नाहीं.

### आमचे पुणेरी संकेत

आणि या हरकियाच्या बारीपासून दोन मैलांवर असलेल्या मल्हार-गड या गांवीं अस्मादिकांचा जन्म झाला असल्याकारणानें तद्देशीय लोककथांबद्दल आवड होती व आहे. मीं तसा कांहीं पराक्रम केला नाहीं. फुग्याच्या वाडीचे सगळेच कांहीं भामटे नसतात. तसेंच सर्वच पुण्याचे नागरिक कांहीं मुत्सद्दी नाहींत. तथापि, स्थानिक अभि-मान, चांगला व वाईटाबद्दल असल्यास वावगें तें काय आहे ? तसें म्हटलें तर दक्षिणची कमाई बारींत लुटण्याऐवजीं दक्षिणेकडून मीं आणलेली कमाई माझ्या बालमित्रांना अभिमान वाटण्याजोगीच होती.

होय, मी अगदीं सामान्य प्रवासी म्हणून जात नव्हतों. मध्य-भारत-विद्यार्थी परिषदेचा ' नियुक्त ' अध्यक्ष म्हणून जात होतों व दक्षिणे-कडील माझी कमाई लुटण्यासारखी नव्हती. माझी कमाई म्हटली तर होती, म्हटली तर नाहीं; आणि म्हणूनच तिजबद्दल विशेष अभिमान नव्हता व नाहीं. आपल्या जन्मभूमीस भेट द्यावी असा विचार पुणें सोडतांना मनाशीं केला होता. गाड्यांच्या गैरसोयीमुळें व तिकिटांच्या अडचणीमुळें एक दिवस आधींच मी मुंबईहून निघालों होतों व रतलामला एक दिवस मुक्काम करण्याच्या हेतूनें उतरलों. मला लागलीच इंदूरला जातां आलें असतें. पण अध्यक्षानें नेहमीं ठरलेल्या वेळेपेक्षां थोडें उशिराच जावें असा पुणेरी संकेत असल्यानें आणि पुण्याची परंपरा ही बिनचूक असते अशी माझी श्रद्धा असल्यामुळें मी गेलों नाहीं. आणि खरें सांगावयाचें म्हणजे परिषदेचे चालक यांचा मी २४ तास आधीं जाण्यानें विरस झाला असता व मला स्टेशनवर त्यांना धुंडावें लागलें असतें. म्हणून २४ तास रतलाम स्टेशनवर मुक्काम करण्याचें ठरविलें. परिषदेच्या भाषणाचा सारांश दुसऱ्या वर्गाच्या वेटिंगरूममध्यें बसून लिहून काढून, मुंबईस धाडला व राहिलेला वेळ कसा घालवायचा याचा विचार करूं लागलों. मध्यंतरीं एक लष्करी स्पेशल आली व तिच्यासाठीं म्हणून पोलिसांनीं अगदीं हळू हातानें या प्लॅटफॉर्मवरील बिचाऱ्या उतारूंस बाहेर घालविण्याचा सपाटा सुरू केला व नेहमीच्या संवयीनें मीं त्यांत तोंड घातलेंच. स्टेशनमास्तरपर्यंत पोंचलों व त्यानें मग पोलिसांना बोलावून अधिक सभ्यता दाखविण्यास सांगितलें.

### माझा ' शारदा-मंदीर ' प्रवेश !

आगगाडीच्या वेळापत्रकावरून हरकियाची बारी पाहून वेळेवर येणें

शक्य नव्हतें. म्हणून मीं आपला मोर्चा रतलाम गांवांत फिरवला. थोडयाच अंतरावर महाराष्ट्र शारदामंदीर अशी पाटी पाहिली. तथापि, ती इमारत बंद होती व आसपासही कोणी दिसेना. गांवांत जाऊन कांहीं कांहीं व्यक्तींना भेटलों आणि देशी संस्थानांतील जुलूम-जबरदस्तीच्या कहाण्या ऐकल्या. तथापि, महाराष्ट्र शारदा-मंदीर ही काय चीज आहे याचें कुतूहल मात्र गप्प बसूं देईना. म्हणून परत येतांना या मंदिराच्या बंद दारासमोर एक तास उभा राहिलों, व माझी तपश्चर्या फळाला आली. जवळ राहणाऱ्या एका दक्षिणी लहान मुलानें सांगितलें कीं, गुरुवारीं नऊ वाजतां येथें भजन होतें व आज गुरुवार आहे, सबब तुम्ही आज आलांत तर बरें होईल. उरलेला नऊ वाजेपर्यंतचा वेळ शहरांत ठिकठिकाणीं हिंडण्यांत, दहिवडे खाण्यांत घालविला आणि नऊ वाजतां पुन्हां त्या शारदा–मंदिराजवळ आलों. साधारण १० चे सुमारास एका गृहस्थानें दार उघडलें, विजेचे दिवे लावले आणि त्या प्रकाशांत या मंदिराचें स्वरूप पाहिलें. सर्वत्र धूळ मी म्हणत होती. कांहीं मोडक्या कपाटांतून कांहीं तरी पुस्तकें आंत आहेत असें दिसत होतें. एका बाजूस पेटी, तबला व टाळ पडलेले होते. आणखी दोन माणसें आलीं व आम्हीं तिघांनीं मंदिर झाडलें. म्हणजे या बाजूची धूळ त्या बाजूला केली आणि नंतर बैठकी घालण्यासही मदत केली. आणखी तीन माणसें आलीं. बहुतेक रेल्वेचे नोकर होते. मीं नांव सांगितलें नाहीं; पण पुण्याकडील आहें एवढें सांगितलें. एकानें इकडेतिकडे पाहून भीतभीत गांधीजीं-बद्दल विचारलें. दुसऱ्यानें अगदीं हळू आवाजांत पुण्यांतील कांहीं व्यक्तींबद्दल विचारलें कीं, ज्यांत मीही होतों. पण मीं कांहीं थांग लागूं दिला नाहीं. भजनाच्या कार्यक्रमास मी उत्सुक होतों व त्यास

११ वाजतां सुरुवात झाली व एका पोक्तशा गृहस्थानें 'एकदंता वक्रतुंडा बुद्धिच्या नायका' म्हणून गाण्यास—होय, कारण त्यास गाणेंच म्हटलें पाहिजे—सुरुवात केली. त्यानें म्हणावें व इतरांनीं साथ द्यावी याप्रमाणें सारखें चालूच होतें. दुसरें पद लागेल असे वाटेना व हें सुरेल भजन अधिक काळ ऐकण्यास सहिष्णुता शिल्लक राहिली नाहीं. १२ वाजून गेले होते. म्हणून माझा हा शारदा-मंदिर-प्रवेश अंक संपवून मी परतलों. दररोज हा कार्यक्रम होत नाहीं, म्हणून ही शारदा या मंडळींचे आभार मानीत असावी. झोंपेंतसुद्धां या वक्रतुंडानें मला स्वस्थता दिली नाहीं. गाडींत नसून अहोरात्र जागरण घडून भजनाचें पूर्ण पुण्यसुद्धां मला लाभलें नाहीं.

## अखेर जातीवर आले

सकाळीं उजाडतांच इंदूरच्या गाडींत जाऊन बसलों व तेथें माझ्या स्वागतार्थ आलेले विद्यार्थी मित्रही भेटले. मडक्यांतील चहा पीत पीत, खऱ्या ग्रामोद्योगाला सक्रिय पाठिंबा देत देत, इंदूरची परिस्थिति मी समजून घेत होतों. योग्य वेळीं इंदूरला पोहोंचलों व तीन दिवस तेथें राहिलों. तो अनुभव स्वतंत्र रीतीनें येणार असल्यामुळें तूर्त देत नाहीं. इंदूरला असतांनाच उज्जयनीच्या कार्यकर्त्यांनीं आमंत्रण दिलें होतें व त्याप्रमाणें मी उज्जयनीस निघालों. माझ्याबरोबर कांहीं विद्यार्थी कार्यकर्तेही होते. उज्जयनीस ३० वर्षांनीं पुन्हा जात जातों. अगदीं प्रथम मी माझे एक आप्त यांच्याबरोबर आठ नऊ वर्षांचा असतांना गेलों होतों व त्या वेळची आठवण म्हणजे भयंकर थंडीचीच राहिली होती. दुसऱ्या खेपेस म्हणजे चवदा सालीं मी कॉलेजचा विद्यार्थी असतांना गेलों होतों. त्या वेळीं मजबरोबर एक सरकारी अधिकारी होता. त्या वेळीं स्टेशनवर उतरतांच बाहेरील हॉटेलमध्यें आम्ही शिरलों

व जेवण मिळेल का म्हणून चौकशी केली. हॉटेलवाल्यानें दक्षिणी आहों हें पोषाखावरून ओळखून आडनांव विचारलें व तें सांगतांच ' कोंकणस्थ ब्राह्मण ' म्हणून तो थोडा मागें सरला. नंतर मजबरोबरील पाहुण्यांचेंही नांव विचारलें व तेही कोंकणस्थ निघाल्यानें तो अधिकच बिचकला. त्यानें आम्हांस जेवावयास घातलें, पण आमचीं पानें इतरांपासून दूर ठेवलीं. आम्हीं दिलेले पैसे मात्र टाकले नाहींत. कोणाला ठाऊक, कदाचित् त्यानें जास्तीही घेतले असतील ! उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः चितोड-मेलसा भागांत दक्षिणी लोकांवर फार कटाक्ष आहे. मराठ्यांनीं रजपुतांचा फार छळ केला असें म्हणतात. " हिंदुस्थानमें तीन, कसाई, पिसु खटमल और दख्खनी भाई " ही तेथील प्रचलित म्हण कदाचित् याच गोष्टीची साक्ष असेल. तथापि, दक्षिणी माणसानें दक्षिणी माणसाचा आणि विशेषतः परदेशांत असा उपमर्द करावा हें थोडें खेदजनक होतें. त्या वयांत मी हें कां हें समजूं शकलों नाहीं आणि आजही ही क्षुद्र बुद्धि अद्यापि कमी झाली नाहीं; इतकें शिक्षण व इतकी प्रगति होऊन कमी झाली नाहीं, हें कां हेंही कळत नाहीं !

' दे दाना 'चे दिवस गेले !

असें सांगतात कीं, उज्जयनीसाठीं रजपूत राजा व पहिला बाजिराव यांत तुंबळ युद्ध झालें. क्षिप्रा नदी, जिच्या कांठीं उज्जैन वसलें आहे, ती रक्तानें लाल झाली. हिंदुहिंदूंतील हें भांडण निकालांत लागण्याचीं चिन्हें दिसेनात. रजपूत ' आम्ही रणांत मरूं, पण मागें हटणार नाहीं ' असें म्हणत होते, तर मराठे लोक ' मायदेश सोडून आम्ही इतक्या लांब आलों ते अपयश घेण्यासाठीं नव्हे, तर जिंकण्यासाठीं ' असें म्हणत. ' जिंकूं तरी नाहीं तर रणांगणावर मरूं तरी ! ' अशी दोन्ही

दलांची भाषा होती. शेवटीं एका चाणाक्ष ब्राह्मणानें रजपूत राजास सांगितलें कीं, तुम्ही उज्जयनी दान दिल्यास हा दक्षिणी ब्राह्मण तें घेण्यास तयार होईल आणि त्या ब्राह्मणानें बाजीरावास विचारलें, " तुम्हांला उज्जयनी लढूनच पाहिजे असें नाहीं. दान दिल्यास घ्याल का ? " बाजीरावानें उत्तर दिलें, " दान घेणें हा तर आमचा प्रथम धर्म आहे. " आणि क्षिप्रेमध्यें उभे राहून पाण्याची ओंजळ बाजीरावाच्या हातावर सोडून रजपूत राजानें शौर्यावर औदार्यानें विजय मिळवतां येतो हें सिद्ध केलें व बाजीरावानें, " धर्म म्हणजे वस्तुतः व्यवहार आहे " हें सिद्ध करून, 'साधनानामनेकता' या तत्त्वाचा आद्य प्रतिपादक स्वतःच ठरवून घेतलें ! हें जुनें राजकारण आजच्या जगांत किती दुर्मिळ झालें आहे. आज चुकलेल्या शेळयासुद्धां खंडोबाला वाहायला तयार नाहींत, मग हातांत असलेली सत्ता अगर संपत्ति दान देण्याची गोष्ट लांब राहिली.

वैद्यराज आणि भाजीवाली !

उज्जयनी शहर मराठयांना कसें मिळालें याचा वरील इतिहास मजबरोबर प्रवास करणाऱ्या विद्यार्थि कार्यकर्त्यांना खुलवून सांगत असतां आमची गाडी क्षिप्रा स्टेशनजवळ आली. ज्या क्षिप्रेचें वर्णन कालिदासानें आपल्या काव्यांत केलें आहे, ती भाग्यवान नदी पाह्यला मिळाली म्हणून आनंद झाला. क्षिप्रेच्या तरंगाबरोबर सहवास घेऊन येणारा 'अनिल' थंडीच्या दिवसामुळें सुखविण्याऐवजीं किंचित् त्रासदायकच वाटला. थोडयाच वेळांत आमची गाडी उज्जैन स्टेशनांत आली आणि काँग्रेसच्या व गांधींच्या जयजयकारांत अस्मादिकांचें स्वागत झालें. कोणीं नांव विचारलें नाहीं व कोणी बिचकून मागेंही सरला नाहीं. स्टेशनभर खादी टोपीवाल्यांचा अफाट समुदाय जमला

होता; फुलांच्या व सुताच्या हारांची गणना करण्याची ‘ सावरकरी ’ संवय नसल्यामुळें ती केली नाहीं. तथापि, पुढारीपणाचा हा बोजा कांहीं कमी जड नव्हता. माझ्या हिंदी बोलण्यामुळें अनेकांना आनंद व कांहींना आश्चर्यही वाटलें. कालिदासाच्या या नगरींत संस्कृत जरी चालू नसलें, तरी संस्कृतमय हिंदी ‘ चालू नाणें ’ आहे. अर्थात् हें वरच्या वर्गांतील लोकांच्या सामाजिक जीवनांतील आहे. असलें हिंदी मंडईंतील माळणीशीं बोलण्यास काय उपयोगी पडणार ? असें म्हणतात कीं, पुण्यांतील एक नामवंत वैद्यराज कांहीं वर्षांपूर्वी उज्जयनींत आले असतां, भाजीकडे बोट दाखवून “ इस वस्तुजातका मूल्य क्या है ? ” हा प्रश्न विचारते झाले व त्याचा अर्थ माळणीला कळला नाहीं म्हणून त्यांना आश्चर्य वाटलें. ‘ बाधतिबाधते ’ सारख्या गोष्टी ऐकलेल्या शास्त्रीबोवांना अवंतिकेंतील सामान्य ललनासुद्धां संस्कृतपटु असावी असें वाटलें असेल !

हीच का ती उज्जैन !

दोन दिवसांच्या मुक्कामांत शककर्त्या विक्रमादित्याच्या राजधानींत अनेक दृश्यें पाहिलीं व अनुभवलीं. भर्तृहरीला ‘ शतकत्रय’ लिहिण्याची प्रेरणा करणाऱ्या शहरांत आतां प्रेरणा करण्यासारखें कांहीं दिसलें नाहीं. कुठेंही नवरत्न सभा दिसली नाहीं, उलट ‘ शाम्भवी ’चे अड्डे दिसून आले. कालिदासाच्या नांवानें शाळा-विद्यालयें दिसून येण्याऐवजीं उपाहारगृहें व नापिकगृहें पाहण्याचा प्रसंग आला. पुण्यांतसुद्धां शिवाजी, लोकमान्य, गांधी यांचीं नांवें असल्याच दुकानांशीं संलग्न झाल्याचें दिसून येतें कीं नाहीं ? कदाचित् लोकशाही व समताभावाचा हा पुरावा असेल. इतिहासामध्यें अमरपद पावलेल्या या वस्तूंस कां अमरपद मिळालें याचें कारण पार्थिव दृष्टीनें दाखवितां येण्यासारखें शिल्लक

राहिलें नाहीं. नगरचा देव ' श्रीमहांकाळ ' किती तरी शतकांपासून भूमिगत झाला आहे, विक्रम फक्त संवत्सरांत राहिला आहे, वैभव स्मृतींत शिल्लक आहे. ' आहे सांप्रत उज्जनी नगर तें राज्यांत शिंद्याचिया. ' पण तेथेंही वैभव अगर आधुनिकता नाहीं.

अखेरीस चैतन्याचा लाभ !

दोन दिवसांच्या मुक्कामांत निरनिराळ्या पांचसहा ठिकाणीं चर्चा व भाषणें झालीं. अर्थात् तीं सर्व हिंदींत झालीं. खाजगी झालीं, जाहीरही झालीं; पण या सर्व मुक्कामांत अवन्तिकेचें प्राचीन वैभव व विद्यमान दैन्य यांतील विरोधामुळें खिन्नतेची छाया पार्श्वभूमि झाली होती. आणि त्यांत निरनिराळे कार्यकर्ते आसपासच्या संस्थानिकांच्या जुलुमांच्या कथा सांगून विषाद उत्पन्न करीत होते. चौकशीशिवाय अटक, स्त्रियांवर अत्याचार, गरीब अज्ञ जनतेची पिळवणूक, मागसलेल्या भिल्लांशीं अमानुष वर्तन यांबाबत कथा ऐकतां ऐकतां चित्त बेभान होत होतें. तसेंच, विद्यमान राजकारणांत वावरणाऱ्या कार्यकर्त्यांमधील विरोध हाही दुखवीत होता. भाईनें यावें व काँग्रेसवाले भांडवलवाल्याचें वकीलपत्र घेतात म्हणून तक्रार करावी. त्यांनीं उत्तर द्यावें, भाई ज्या शेतकऱ्यांची तरफदारी करत आहे, ते सर्व त्यांच्या वडिलांचे देणेकरी आहेत. आणि अशाच चालीवर कार्यकर्ते विद्यमान राजकारण चालवीत होते ! ' या विद्यमानांतून पुन्हा वैभवाला हा देश केव्हां जाईल व जगाला ललामभूत होणारे विद्वान केव्हां निपजतील ? पुन्हां केव्हां शककर्ता विक्रम निर्माण होईल ? पराक्रमाला महाकाव्यानें चिरस्थायी करणारा महाकवि केव्हां निर्माण होईल ? शौर्य व शृंगार या दोन रसांचा सुंदर मिलाफ समाजांत व काव्यांत केव्हां पाहावयास मिळेल ? ' या व अशा विचारांत अनेक क्षण मीं काढले. निघण्यापूर्वी

'पुरुषस्य भाग्यम्' या लोककथेंत न्याय देणाऱ्या महांकाळच्या दर्शनाला गेलों व श्रद्धायुक्त अंतःकरणानें प्रार्थिलें. "भूमीवरील अन्याय असह्य झाला आहे. प्रगट हो व आमचें आम्हांस मिळूं दे !" अंतःकरणांत मिळणार अशी श्रद्धा वाटूं लागली व अवंतिकेला आल्याचें सार्थक झालें. खरें चैतन्य घेऊन मीं अवंतिका सोडली.

४

## काँग्रेसची राजवट आली तर—

तो दिवस माझ्या पंचांगांत अगदीं भाकड होता. म्हणजे त्या दिवशीं कोठेंही व्याख्यान नव्हतें, अनौपचारिक चर्चा नव्हती, कोठेंही माझ्या हजर राहण्यानें प्रसंगास शोभा येणार नव्हती. कोठेंही उद्‌घाटण करावयाचें नव्हतें, कोणच्याही बातमीदाराला बळेंच बोलावून आणून चहा पाजून मुलाखत द्यावयाची नव्हती, महत्त्वाच्या व्यक्तींना संकेतानें भेटावयाचें नव्हतें. तात्पर्य, त्या दिवशीं मला कांहीं 'कार्य' नव्हतें. इतकेंच काय, कुणाला घेऊन बोलपटालाही जावयाचें नव्हतें. बोलपट

पाहणें सटीसहामासींच वांट्याला येतें आणि तो जोडीनें पाहणें कपिला-षष्ठीचा योगच. तात्पर्य, त्या दिवसाची संध्याकाळ कशी घालवावी या विचारांत होतों. नित्य जोडीला असणारे तेही आज येणार नव्हते आणि म्हणून अस्मादिकांनीं नव्या पुलावर जाण्याचा विचार केला !

आमचा मारुति वीरांचा आहे !

फिरावयासाठीं हातांत काठी घेऊन बाहेर निघालों. डोक्यांत कांहींच विचार नसल्यानें पायाखालच्या रस्त्याकडे साहजिक लक्ष गेलें. आणि रस्त्यांत ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या निवेदनापेक्षांही अधिक खांचखळगे दिसून आले. दोन्ही बाजूला घरें होतीं. एवढ्यामुळेंच या मधल्या जागेस रस्ता म्हणणें भाग होतें. कालांतरानें मनुष्याच्या कीर्तीवरील डाग जसे धुवून जातात, तद्वत् रस्त्यावरील डांबरीपणा नाहींसा झाला होता. आमच्या त्या उभ्या रस्त्याला कोणीच ‘ मेहरबान ’ राहत नसल्यानें रस्ता-दुरुस्तीचा मुहूर्त आम्हांला लाभला नव्हता आणि शिवाय असेंही सांगण्यांत येत होतें कीं मिळणारें डांबर सभासदांच्या कारखान्यांतच खलास होत आहे. संसाराचा यात्रा-पथ बिकट आहे. आणि याचें प्रात्यक्षिक म्हणजे आमच्या आळींतील रस्ते होत. रस्त्याच्या परिस्थितीमुळें सरळ चालणाऱ्या स्त्रियांचीं पावलेंसुद्धां कालिदासाच्या शब्दांत ‘ विषमी भवन्ति ’ अशीं होत होतीं. आणि मी जात असतांना ‘ काँग्रेसचें प्रधानमंडळ आलें, तरी तुझ्या हातचा वस्तरा थोडाच जाणार आहे,’ असा आवाज नामूच्या दुकानांतून आला; आणि बहुतकरून त्या गृहस्थानें मला पाहूनच मोठ्यानें उद्गार काढले असतील. नामदेवाचें सलून म्हणजे मुख्यत्वें वाचनालयच आहे. धंद्याच्या गिऱ्हाइकांपेक्षां फुकट्या वाचकांची संख्या अनेक पटींनीं आहे. ( हळूच सांगतों, प्रसंगीं मीही एक त्यांत आहें ! ) वरील वाक्य मीं ऐकलें, तथापि न थांबतां तसाच पुढें निघालों.

आणि आमच्या वीराच्या मारुतीजवळ आलों. वाचकांना एक गुपीत सांगूं का ? आमचा हा मारुति वीरांचा आहे आणि गेल्या ५० वर्षांत त्यानें आपलें यथार्थत्व शाबीत केलें आहे.

म्हशी आणि मोटरी

क्षणभर बेत बदलण्याचा विचार मनांत आला आणि असें वाटलें कीं, स्मशानांतून नदी ओलांडून पलीकडे जावें. पण, विचार केला कीं नव्या पुलावर जाऊन सहल करावयाच्या ध्येयापासून ढळणें बरोबर नाहीं. समोर चालूं लागलों. फुटक्या बुरुजाकडे पाहून कडेकडेनें जात होतों; कारण मधून जाण्याची सोयच या रस्त्याला नाहीं. सकाळीं म्हशी, दुपारीं मास्तरणी व संध्याकाळीं मोटरी यांची मिरासच या रस्त्याला आहे ! आणि या दिव्यांतून धक्का न खातां जाणें हें एक भाग्य आहे ! मी कडेनें जात होतों व माझें लक्ष जरी कोणाकडे नसलें, तरी इतरांचें लक्ष माझ्याकडे नव्हतें असें मात्र नाहीं. कारण लगेच उजव्या बाजूच्या घरांतून 'अहो, काकासाहेब,' आवाज आला आणि मग माझ्या सहलीला विघ्न उत्पन्न होऊन त्या गृहस्थाच्या घरांत जावें लागलें.

आमचे नाना

दारांत प्रवेश करतांच, "दैवानें आज माझें गाऱ्हाणें ऐकलें. मला किती आनंद झाला." मी मात्र मनांत नाखुष झालों. तथापि, नाखुषीनेंच आंत शिरलों. उन्हाळ्याचे दिवस असूनही जमिनीला ओल होतीच. कदाचित उन्हाळा कमी भासावा म्हणून मालकानेंच ही सोय केलेली असावी ! खोलींत एक मळकी सतरंजी पडली होती. त्यावर एक तक्क्या होता; पण तो ब्रह्मासारखा मायाविरहित म्हणजे अभ्र्याशिवाय होता. सतरंजीवर निरनिराळ्या प्रकारचे डाग दिसत होते. ती किती जुनाट होती हें सांगणें कठिण होतें. तथापि आदरांत आणि आपुलकींत नाना

कमी नव्हते आणि त्यांनीं मला त्या तक्क्याशीं बसविलें आणि डोळ्यांत पाणी आणून ' अहो, आतां आमच्याकडे बघा कीं, आतां मरण्याची पाळी आली आहे ' असें कळवळून नाना बोलूं लागले. नाना म्हणजे आमच्या पेठेंतील एक दोन हार व्यक्ति आहे. कुणाही गृहस्थानें कामास बोलवावें, तेथें हजर! गणपति उत्सव असो, मारुतीचा उत्सव असो, नाना अंग मोडून काम करण्यास सदैव तत्पर असतात.

नाना हे भिक्षुकवजा गृहस्थ आहेत. एकदोन दुकांनीं लिहिणें करतात व बाकीचा चरितार्थ भिक्षुकीवर पुरा करतात. १९४२ च्या पूर्वीपर्यंत त्यांची स्थिति बरी होती. हें मला माहित असल्यानें त्यांच्या काकुळतीच्या बोलण्याचा मला अर्थ कळेना.

### रेशनिंगमुळें धर्म बुडाला

" अहो, तुमच्या या रेशनिंगनें आमचा धर्म तर बुडालाच; पण आतां प्राण जाऊं पाहत आहे." असें म्हणणाऱ्या नानांना मी विचारतों, " तुम्ही काय सांगतां ? " नाना तळमळून बोलूं लागले, " सटीसहामाशीं गहूं खाणारे आम्ही, आतां दररोज गहूं खाण्याचा प्रसंग; दररोज कसे परवडणार, त्याला लागणारें तूप कोठून आणणार ? अहो, बाजरी तर आतां आठवणींतच राहिली. अहो, रात्रीचें थालिपीठ गेलें, लोणी दिसेनासें झालें आणि ज्वारी काय सांगावी वास घेववत नाहीं अशी आहे, आणि तांदूळ आठवड्यास अर्धा शेर म्हणजे भरगच्च. चित्राहुतीसुद्धां घालतां येत नाहींत. ' आत्मानाम् सततं रक्षेत् ' ह्या न्यायानें भाताच्या चित्राहुतीही बंद केल्या. अहो, धर्म बुडाला ! श्राद्धपक्षांतून पिंडदान उठून गेलें. कसे पितर संतुष्ट होणार ? नाहीं युद्ध लांबलें तर काय होईल ? अहो, हें पाप आतां पाहवत नाहीं. 'हीं पाहा आमचीं मुलें' आणि हें वाक्य उच्चारतांच एक मुलामुलींचा घोळकाच्या घोळका

खोलींत आला. पावशेरापासून पायलीपर्यंत जशीं क्रमवार मापें असावींत तशी ही बालसेना दिसत होती. संध्येंतील चोवीस नांवें बहुतेक संपलींच असावींत व बगाली नांवांवरही आक्रमण झालेलें असावें, असें वाटत होतें !

## तांदळावांचून झालेली दैना

नानांच्या पत्नीला लग्नाच्या वेळीं दिलेला आशीर्वाद अक्षरशः खरा झालेला वाटत होता ! 'अहो काका, ही पाहा आमच्या ब्राह्मणांच्या मुलांची तांदुळावांचून झालेली दैना ! हल्लीं कोठेंही श्राद्धपक्षाला जेवण नाहीं. लग्नकार्यांत हात भिजत नाहीं. षण्मासे, षण्मासे भवन्तो ब्रुवन्तो हें नुसतें कोरडें बडबडावें लागतें पाहा ! तुम्हीच पाहा ! ह्या मुलांचीं हाडें निघालेलीं पाहा. मी मुलांकडे पाहिलें व सर्वसाधारणपणें नाना म्हणत होते तें खरें ! एक वेळ मनांत असें येऊन गेलें कीं एवढीं मुलें कशास जन्मास घातलीं ? पण हा प्रश्न अंगावर येण्यासारखा होता म्हणून विचारला नाहीं. मी त्यांना म्हणालों, 'अहो, सरकारनें तर असें छापलें आहे कीं, मुख्यत्वेंकरून भातावर राहणाऱ्या मनुष्याला दररोज १० औंस तांदुळ, पांच औंस धान्य, ३ औंस डाळ, ८ औंस दूध, २ औंस फळें व १० औंस भाजीपाला हा अवश्य आहे, असें म्हटलें आहे. असो. ' औंस म्हणजे काय हें मला सांगा कीं, ' मीं त्यांना म्हटलें. ' घटकाभर १ औंस म्हणजे अर्धा छटाक समजा. ' त्यावर नाना उत्तरले, ' ह्यांतला चौथा हिस्सासुद्धां आम्हांला मिळत नाहीं. भाजी नजरेस पडत नाहीं आणि रुपयाला शेर दूध मी कसें घेऊं ? काळ्या बाजारांत तांदुळ मिळतो, पण पैसे कुठें आहेत आणि शिवाय असले खटले गरिबांवरच होतात. आज जर चंगळ असेल, तर पैसेवाले व पोलिस ह्यांची. त्यांना कांहीं कमी नाहीं. मी म्हणालों, ' नाना, हें

सर्वस्वी खरें नाहीं; जर पुण्यांतील लोकांना हें असह्य झालें असतें, तर त्यांनीं संघटित प्रतिकार केला असता. मुंबईला अधिक शिधा मिळतो. अधिक तांदुळ मिळतात. पुणें जिल्ह्यांत आंबेमोर पिकतो व पुण्याच्या वांट्याला वाईट तांदूळ मिळतो हें तुम्ही सहन करतां म्हणून चालू आहे.'

## अरे, आम्हांला जिवंत ठेवा !

'चूक आहे तुमची. तुम्हीं काँग्रेसवाल्यांनीं सत्ता सोडलीत, त्यामुळें आमचे हे हाल होत आहेत.' 'अहो, अधिकारावर असतांना आम्हीं धर्मबुडवे होतों. मुसलमानधार्जिणे होतों. सत्तेला चिकटून बसणारे होतो, असें तुम्ही, तुमचे पुढारी व तुमचीं वर्तमानपत्रेंच म्हणत होतीं ना? आणि जेव्हां अधिकार सोडला, तेव्हां मुक्तिदिन साजरा करण्यांत तुम्ही होतांच कीं नाहीं! आणि आजही तुमचे स्वातंत्र्यवीर इंग्रजांचाच कारभार बरा म्हणतात ना?' 'अहो काका,आतां त्या जुन्या गोष्टी सोडा. पोटभर अन्न मिळत नाहीं. धड वस्त्रही मिळत नाहीं. आम्हीं जनता आहों ना. तुम्हांला स्वातंत्र्य मिळवायचें आहे, त्यासाठीं तरी जनता पाहिजे का नको? का कबरस्तानांतील स्वातंत्र्य पाहिजे आहे? कसेंही करा, आणि आम्हांला जिवंत ठेवा!'

आणि अगदीं असेच शब्द ४२ च्या अखेरीस नाशिक जेलमध्यें असतांना तेथील शिपायानें काढलेले आठवले. तेथें रेशनिंग सुरू झालें नव्हतें, बाजारांत गरिबांना धान्य मिळत नव्हतें आणि रात्रीं पहाऱ्याच्या वेळीं खोलीजवळ येऊन तेथील पहारेकरी हवालदारानें हेच विचार प्रदर्शित केले. 'तुम्हीं सर्व आमच्यासाठीं हाल सोसतां हें खरें. तुम्हीं राज्य मिळवणार हेंही खरें; पण त्या राज्यांत जिवंत प्रजा तर असली पाहिजे ना! कांहींही करा, आणि आम्हांला जगवा!' हे त्याचे शब्द

मनासमोर येऊन गेले. मीं नानांना म्हटलें, ‘ तुम्ही म्हणतां हें सगळें खरें, पण हा लढा कशासाठीं सुरू झाला हें माहित आहे ना ? पैठणीची मागणी करून शेवटीं पटकूर घेऊन तडजोड करावयाची का ? तुम्हीं धीर धरला पाहिजे. अपेष्टांचें हें हलाहल पिऊनच जनता स्वातंत्र्य मिळवणार आहे. हें आपण भोगलेंच पाहिजे. अन्य देशांत स्वातंत्र्यासाठीं प्राणार्पण मोठ्या प्रमाणावर करावें लागत आहे, आणि आपण या एवढ्या प्रचंड वस्तूसाठीं काय किंमत देत आहोंत ? जर तुम्हींच शिकलेलीं माणसें प्रतिगामी विचार पाखूं लागलांत, तर कसें चालणार ! अर्धपोटीं कसें रहावें हें माहित आहे ना ! ’ ‘ अहो, सर्वांसाठींच अधिकार घ्या. आम्हांलाही अर्धपोटीं ठेवूं नका व त्यांनाही ठेवूं नका ! ’

## तांदुळ तर मिळतील !

नानांचा विचार तर्कशुद्ध होता; पण तर्कानें आज कोणते प्रश्न सुटले आहेत ? मी त्यांना म्हणालों कीं, ‘ समजा, कॉंग्रेसनें अधिकार घेतला तर अशी कोणती क्रांति तुमच्या शिध्यामध्यें होणार आहे ? ’ ‘ निदान चिपटभर तांदूळ तरी अधिक मिळतील, एवढं तर होईल ना ? ’ नाना म्हणाले.

आणि मी हें त्यांचें वाक्य ऐकत असतांना त्यांच्या डोळ्यांकडे पाहत होतों. त्यांत मूर्तिमंत कारुण्य वसत होतें. आशा त्यांत डोकावत होती. मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं व चहाचा आग्रहही नाकारला; कारण माझ्या डोक्यांत निराळेच विचार सुरू झाले. स्वातंत्र्यासाठीं प्राणार्पण करण्याचा उपदेश करणारे, परकीय सत्तेकडे नोकऱ्यांमागें लागलेले तरुण माझ्या नजरेपुढें होते. घरादारांवर स्वातंत्र्यासाठीं अग्नि ठेवा म्हणणारे, भाडेकऱ्यांकडून अनेक पटीनें भाडें वाढवून शोषण करणारे समोर दिसत होते. ‘ स्वदेशी हा स्वराज्याचा मंत्र आहे ’ असें

सांगून, आमच्या भावनेचा फायदा घेऊन नफेबाजीनें कोट्यवधि रुपये मिळविणारे ' त्यागी ' गांधीभक्त नजरेआड नव्हते. सूर्य अस्तास गेल्यानंतर चंद्र प्रकाशमान नसतांना तारेही लुकलुकत नाहींत, त्या वेळीं काजव्यानें चमकून घ्यावयाचें नाहीं तर कोणी ? देश स्वतंत्र व्हावा म्हणून छातीवर गोळ्या घेणारे, लाठ्यांनीं डोकीं फुटलेले देशभक्त स्मृतीपुढें येत होते. आणि त्याच वेळीं चालत्या काळीं देशभक्तीचा काजव्यासारखा प्रकाश करून ज्यांनीं आपल्या आदर्शाचा व्यापार केला, असेही लक्ष्मीपुत्र डोळ्यांपुढें उभे होते आणि ह्या सर्वांना मी कांहीं बोलूं शकत नव्हतों. अन्याय, लांचलुचपत, पाप यांचें साम्राज्य सर्वत्र पसरलें म्हणून महात्माजी उपवास करणार होते. समाजांतील यच्चयावत् वर्गांतून नैतिक अधःपात झालेला दिसत होता आणि ह्या स्थितींत एका गरीब ब्राह्मणानें अधिक तांदुळासाठीं अधिकारग्रहण करा असें म्हणणें यांतील विडंबन क्षमस्व म्हणण्याजोगें होतें. उत्कटापासून उच्छिष्टापर्यंत ही गति होती व ती आदर्शाला सोडून होती हेंही खरें; पण त्यांत मान्यता होती हेंही तितकेंच खरें. जगणें का मरणें, ह्या प्रश्नाचें त्यांत उत्तर होतें. कोणी असल्या आदर्शशून्य जगण्यापेक्षां मरणें बरें म्हणतील आणि कोणी आदर्श हे जिवंत माणसासाठीं असतात म्हणून जगणें हें पहिलें कर्तव्य समजतील. आणि मी तरी असा कोण कीं, दुसऱ्या वर्गास नांवें ठेवावींत ? परत जातांना रस्त्यांतील गर्दीमुळें विचारमालिका तुटली; तथापि रात्रभर त्या ब्राह्मणाची ती दीन मुद्रा व अधिक तांदूळ तरी मिळतील हें वाक्य सारखें मनांत घोळत होतें.

५

## येरवड्याच्या तुरुंगांत सर्वच ‘ मुनिर ’

आमचा अण्णा हा माझा शाळेपासूनचा मित्र आहे. कांहीं कारणामुळें कॉलेजचें शिक्षण अर्धें सोडून त्याला नोकरी पत्करावी लागली. आज त्याची स्थिति बरी असून जगाच्या दृष्टीनें तो पूर्ण सुखी आहे. त्यानें शिक्षण जरी सोडलें, तरी ज्ञानाची हौस कधींच सोडली नाहीं. त्याचें वाचन विस्तृत, विचार व्यापक व दृष्टि जें जें श्रेष्ठ असेल तें घ्यावें अशी आहे. चालू राजकारण तो चांगलेंच जाणतो आणि त्यामुळेंच अनेक वेळां त्याच्याशीं विचारविनिमय करण्यांत व वाद-

विवाद करण्यांतही मला आनंद वाटतो. इतकेंच नव्हे, तर पुष्कळ वेळां त्याच्या माहितीचा मला फायदाही होतो.

मी तुरुंगांतून सुटून आल्यानंतर नेहमींप्रमाणें त्यानें मला चहापानास बोलाविलें व या खेपेचा अनुभव विचारला.

मी त्याला सांगूं लागलों, “ सरदारगृहांत नऊ ऑगस्टच्या पहांटेसच पकडापकडीचें वृत्त आम्हांस कळलें होतें. मुंबईला जाण्यापूर्वींच पुन्हा पुण्याला परत येतां येणार नाहीं, सरळ येरवड्याला जावें लागेल, अशी पूर्ण कल्पना होती व तशीच घरीं करूनही दिली होती. तथापि गांधीजींच्या भाषणानें महिनाभर तरी कांहीं होणार नाहीं असें वाटून आमच्यापैकीं बहुतेक सरदारगृहांत निर्धास्त होते.

नऊ ऑगस्टच्या प्रातःकाळीं सरदारगृहाला पोलिसांनीं वेढा दिला, व प्रत्यक्ष तेथें जरी अटक झाली नसली, तरी शिवाजीनगराला उतरतांच मला व अन्य कार्यकर्त्यांना त्याच दिवशीं दुपारीं अटक झाली. नऊची रात्र येरवड्यांत काढली.

दहा ऑगस्ट उजाडेपर्यंत येरवड्यांतील बराकी भरून गेल्या. अवघ्या आठ दिवसांत राजकीय कैद्यांची संख्या हजारोंनीं वाढली. नियमाप्रमाणें अंथरुण, पांघरुण, कपडे, भांडीं, कांहींच मिळेनासें झालें. तुरुंगाधिकारी तर भांबावून गेलेले दिसत होते. तासातासाला-दिवसा आणि रात्रीं-राजकीय कैदी घोषणा करीत येरवडा ‘ मंदिरां ’त प्रवेश करीत होते. बराकीमध्यें नियम झुगारून माणसें कोंबण्यांत येत होतीं व जेलच्या अधिकाऱ्यांनीं कांहीं केलें तरी व्यवस्था होणें अशक्य झालें होतें. सर्व राजबंदींच्या वतीनें तुरुंगांतील अधिकारी मजबरोबर पुष्कळ गोष्टी ठरवीत. त्यांचा निरुपाय मला स्पष्ट दिसत असे. राजबंद्यांची गैरसोय आणि त्रास व त्यांचा राग मात्र क्षणाक्षणाला भासत होता. शेवटीं

माझ्या सांगण्यावरून बराकींत जाण्याचें आमच्या मंडळींनीं नाकारलें व नियमाप्रमाणें प्रत्येकाला जागा मिळालीच पाहिजे असा आग्रह धरला. येरवड्याच्या आसपास मिलिटरी सर्वत्र पसरलेली होती, त्यांच्याकडून तंबू मागवून व्यवस्था करण्यास मीं अधिकाऱ्यांना सुचविलें व तें मान्य होऊन दोनचार दिवसांत सर्वत्र तंबू ठोकण्यांत आले आणि तुरुंगाला लष्करी छावणीचें स्वरूप प्राप्त झालें ! सर्व बाबतींत आमचें आम्ही पाहण्याचें ठरविलें व त्यामुळें स्वयंशासित वसाहतीचें स्वरूप कांहीं काळ तेथील वस्तीस मिळालें. स्वयंपाक करणारे आमच्यांतील, वाढणारे आमच्यांतील, टपालाची ने-आण करणारे आमच्यांतील, व्यायामाची व्यवस्था पाहणारे आमच्यांतीलच; सर्व कांहीं शिस्तीनें चालत असे. जी बिनराजकीय कैदीमंडळी तेथें कामाला येत, तीही अगदीं खूष असत. ”

वरील आशयाची माहिती ऐकून अण्णा म्हणाला, “ मग तुम्हा पुढाऱ्यांची तर आणखी जादा व्यवस्था असेल ? ”

“ तसें कांहीं नव्हतें; तुरुंगांत सर्वांनीं मला पुढें केलें ही गोष्ट खरी आहे; परंतु त्यामुळें आमची कांहीं खास व्यवस्था केली असें मात्र नाहीं. उलट, राजबंदी व अधिकारी यांचे दररोज जे खटके उडत ते मिटवतां मिटवतां आम्हांला जीव नकोसा होई. तथापि एक गोष्ट मात्र लक्ष्यांत ठेवण्यासारखी तेथें होती. ती म्हणजे मुनिर ही व्यक्ति ! ”

“ ही आणखी कोण व्यक्ति ? ”

“ हा काळा टोपीवाला कैदी. ”

“ काळा टोपीवाला कैदी ? ” अण्णानें विचारलें.

“ हं, ज्या कैद्यानें एकापेक्षां अधिक शिक्षा संपादण्याचा पराक्रम केला असेल तो. त्याला काळ्या रंगाची टोपी घालावी लागते. मात्र

या शिक्षा संपत्तिविषयक गुन्ह्याबाबत असाव्या लागतात. दहा वेळां मारामारी केली अगर डोकीं फोडलीं व दहा वेळां शिक्षा झाली तरी त्याला काळी टोपी मिळत नाहीं. क्षुल्लक चोऱ्या जर एकापेक्षां जास्त वेळां केल्या व त्याबद्दल शिक्षा झाली, तर हा मान मिळतो."

"हें असें कां?" अण्णानें विचारलें.

"याचें कारण आजचा समाज लोकांच्या जीवापेक्षां त्यांच्या संपत्तीला अधिक मान देतो हें! भांडवलशाही समाजरचनेंत जीवितापेक्षां वित्त श्रेष्ठ समजलें जातें व म्हणून त्याचें संरक्षण अधिक केलें जातें. काळ्या टोपीप्रमाणें जेलमध्यें तांबडी टोपी व पिवळी टोपी असेही प्रकार असतात. पांचांपेक्षां अधिक वर्षांची शिक्षा झालेल्या कैद्याला पिवळी टोपी घालावी लागते व धोकेबाज पळण्याचा प्रयत्न केलेल्या कैद्याला तांबडी टोपी देण्यांत येते. अनेक कैदी दुरंगी टोपीचे असतात; पण तिरंगी टोपीचाही एक कैदी एकतीस सालीं आमच्या वार्डींत होता. तो म्हणजे प्रसिद्ध बाबू चष्मेवाला होय. मुनिर हा काळा टोपीवाला असला, तरी तो तितकाच प्रामाणिक व मोकळ्या मनानें खरें बोलणारा होता."

"म्हणजे चोर प्रामाणिक असतात तर?" अण्णा म्हणाला.

"ज्या प्रमाणांत प्रामाणिक चोर असतात त्या प्रमाणांत!"

"या मुनिरची हकीकत तर सांग."

"हा मुनिर आमचा मुक्काम तंबूंत असेपर्यंत अगदीं नियमानें माझें सर्व काम करी. जी गोष्ट त्यास सांगावी, ती बिनचूक व टापटिपीनें करी. अर्थात् ही त्याची वागणूक सर्वांशीं नसे. इतकेंच काय, तर माझ्या तंबूंत असलेल्या इतर दोन राजबंद्यांच्या बाबतींतही तो इतका आदर दाखवीत नसे, आणि अन्य राजबंद्यांची त्याबद्दलची तक्रारही

नेहमीं माझ्या कानावर येई. मला वाटे कीं, हा आमच्या मंडळींत मी प्रमुख आहें म्हणून मजबद्दल इतका आदर दाखवतो, इतका झटतो, आणि या विश्वासानें मी त्याच्याशीं वागत असें; पण एक दिवस या वागणुकींतील रहस्य आमच्यांतील एका राजबंद्यानें शोधून काढलें, व तें ऐकून मी चकित झालों. मीं त्यास बोलविलें तेव्हां तो मला म्हणाला,

" तुमच्याबद्दल मला आदर वाटतो याचें जें कारण तुम्हांला समजलें आहे तें खरें आहे. गेल्या वीस वर्षांत मीं अनेक चोऱ्या केल्या, पण मला कधींही फारशी प्राप्ति झाली नाहीं. मीं कधीं कोणाचा घातपात केला नाहीं. माझ्या कोणच्याही गुन्ह्यांत तुम्हांला हिंसा सांपडणार नाहीं. मीं कोणाचें घर फोडलें नाहीं, कोठेंही वाटमारी केली नाहीं. खिसे कापण्याच्या पात्याशिवाय दुसरें शस्त्रही कधीं हातीं घेतलें नाहीं. "

" हा धंदा तूं किती दिवस करीत आहेस ? "

" गेल्या वीस वर्षांवर ! प्रथम बालगुन्हेगार म्हणून मला गुन्हेगार मुलांच्या तुरुंगांत ठेवलें होतें. तेथेंच ही कला मीं अधिक साध्य केली. माझें काम म्हणजे, जेथें सभा असेल, गर्दी असेल, तेथें जावयाचें व शांत रीतीनें एक-दोन सेकंदांत खिसा कापून जें मिळेल तें घ्यावयाचें. केव्हां प्रयत्न फसतात, केव्हां बेताची प्राप्ति होते; पण तुमच्या सभेच्या दिवशीं जितकी प्राप्ति झाली तेवढी कधींच झाली नाहीं; म्हणूनच तुमच्याबद्दल मला विशेष प्रेम वाटतें ! तुमच्या काँग्रेस–भवनांतील बहुतेक सभांना मी हजर राहत असें. अ. भा. काँग्रेसच्या अधिवेशनांतसुद्धां मीं प्रवेश करून घेतला होता. "

" हें तूं करतोस तरी कसें ? "

" त्याचें असें आहे. खादीचे कपडे नियमानें घालावयाचे; गर्दीमध्यें

मोठमोठ्यानें ' इन्किलाब झिंदाबाद ', ' गांधी की जय ' म्हणून ओरडावयाचें; हातामध्यें दोनचार वर्तमानपत्रें, दोनचार पुस्तकें घ्यावयाचीं व गर्दीत घुसावयाचें, असें हें तंत्र आहे. सफाईदार उर्दू बोलून अ. भा. काँग्रेसच्या सभेंतही मीं प्रवेश मिळवला. तुमच्या स्वयंसेवकाला वाटलें, कोणी तरी उत्तर हिंदुस्थानी कार्यकर्ता आहे. तुमच्या वैयक्तिक सत्याग्रहाच्या मोहिमेंतील सभांना हजर राहून थोडेंफार साधलें; पण तुमच्या त्या वेळच्या सत्याग्रहाच्या सभेंत अठ्ठावीसशें रुपयांच्या नोटा माझ्या हातीं लागल्या आणि हें सारें तुमच्या व्याख्यानामुळें झालें; म्हणूनच मला तुमच्याबद्दल विशेष प्रेम वाटतें. "

मुनिरचें हें कथन ऐकून मी कसा चाट झालों हें जेव्हां मीं अण्णाला सांगितलें, तेव्हां अण्णा उद्गारला,

" यांत तुम्हाला त्या एकट्या मुनिरचेंच काय विशेष वाटतें? मुनिरनें काँग्रेस सभांचा फायदा घेतला हें तरी प्रामाणिकपणें तुम्हांला सांगितलें; पण तुमच्या काँग्रेसमध्यें जर तुम्ही अधिक चौकशी कराल, तर शेंकडोंवारी मुनिर तुम्हांला सांपडतील! खादी टोपी घालणाऱ्या जुगाऱ्याना काँग्रेसनें निवडणुकीसाठीं जवळ केलें नाहीं का? राजकारणांत वेळ येईल तशी मतांची लीला करणारे कृष्ण-कन्हैया तुमच्यांत नाहींत का? जनतेचा दुष्काळ राबवून काळा बाजार करून संपत्ति मिळविणारे खादी टोपीवाले आज काँग्रेस-संघटनेंत आहेतच कीं नाहींत? "

" पण अण्णा, ही वृत्ति कांहीं काँग्रेसजनांत असेल, तशी ती इतर पक्षांत नाहीं असें म्हणणें आहे का तुझें? "

" सर्वत्र आहे. हिंदुत्वाचा अभिमान राजकारणापुरता घेणारे संस्थानिक आहेतच ना! गरिबांच्या मुंड्या मुरगळणारे, मोठालीं

देवळें बांधून धर्ममार्तंड म्हणून मिरवतातच ना? आणि साहित्यांत तरी काय आहे? श्रीमंतांची स्तुति करून आपल्या प्रतिभेला विकणारे किती तरी साहित्यिक आहेत. स्वार्थासाठीं कलेची विक्री करणारे किती तरी कलावंत आहेत! तात्पर्य, अंगच्या गुणावर मान्यता मिळविणाऱ्यांची संख्या थोडी असून, परिस्थितीचा फायदा घेऊन श्रेष्ठत्व मिळालेलेच अधिक. चोरी करून मिळविलेलें धन व गुण नसतां मिळालेली मान्यता यांत फरक तो कोणता? दोन्हीकडे अहिंसेनेंच काम होतें; मग तुम्ही एकट्या मुनिरला बोलणें बरोबर होणार नाहीं. त्यानें प्रामाणिकपणें खरें सांगून थोडी कृतज्ञता तरी दाखविली; अन्यत्र तेंही दिसत नाहीं. मान्यता व प्रतिष्ठा आपल्याला योग्य तऱ्हेनें मिळाली आहे, अगर आपण तिला योग्य आहोंत, असा विचार किती जणांच्या मनांत येतो? नेहरू शर्ट घातल्याबरोबर प्रत्येकाला नेहरूंचा रुबाब दाखवावासा वाटतो; भगवी टोपी घातल्याबरोबर सावरकरी शिवराळपणा अंगीं येतो, हातांत 'लोकयुद्ध' घेतल्याबरोबर स्टॅलिनची प्रतिष्ठा कोणीही दाखवूं लागतात व गांधींचें अनुकरण करून किती तरी गांधीभक्त मोठेपणाचा आव आणीत असतात! आजच्या समाजांत गुणांची किंमत करणारें योग्य साधन नाहीं. संपत्ति हें गुणाचें माप असूंच शकत नाहीं. लोकप्रियता हेंही अचूक माप नाहीं, आणि यामुळेंच आजच्या परिस्थितींत गाढवाचे गोपाळराव झाले तर, शोधून काढणें कठीण होतें."

अण्णाचें हें वक्तृत्व ऐकून मी गार झालों! लायकीप्रमाणें मान्यता हा सिद्धान्त चांगला; पण समाजांत तो प्रस्थापित होणें किती तरी कठीण आहे. लायकीपेक्षां जास्त मिळालें म्हणजे तें चोरीसारखें मानावयाचें का? तसें झालें तर कठीणच प्रसंग म्हणावयाचा! सर्वच मुनिर ठरतील. प्रयत्न व फळ यांत सर्व काळ प्रमाण राहतें असें थोडेंच आहे;

तसेंच, सर्व प्रयत्नांची सामाजिक किंमत एकाच दृष्टीनें पाहणें हेंही बरोबर नाहीं आणि हें जाणूनच मीं अण्णाला म्हटलें,

" शिकंदर बादशहासमोर दरोडेखोरानें जो दावा सांगितला, तोच तूं सांगत आहेस. दरोडेखोर एकट्या–दुकट्याची चोरी करी, एखाद–दुसरें घर फोडी, एखादा–दुसरा खून करी; पण शिकंदर प्रदेशचे प्रदेश लुटी, युद्धांत लाखों लोकांना यमसदनास धाडी; आणि याच तुलनेनें दरोडेखोरानें शिकंदरास आपण व बादशहा यांच्यामध्यें कांहींच फरक नसल्याचें सांगितलें. एकाचा व्यापार किरकोळ व दुसऱ्याचा घाऊक; एवढाच फरक. तसाच विचार करूं लागलों तर, कॉंग्रेसच्या सभेंत खिसे कापणारा मुनिर व मोठमोठ्या कार्यक्रमाच्या गप्पा मारणारा मी व दुसरे यांत फरक तो कोणता ? "

" कांहींच फरक नाहीं. "

" म्हणजे शिकंदर बादशहाप्रमाणेंच वेळ आली म्हणावयाची. शिकंदर आणि दरोडेखोर ! देशासाठीं प्रतिज्ञा घेऊन लढणारे वीर आणि खिसेकापू मुनिर ! खरोखर विचार करण्यासारखी गोष्ट आहे ! "

६

## चलो यार लंडनमें !

एका महान् कवीनें म्हटलें आहे कीं, कांहीं वेळा काल झपाट्यानें चालतो, तर कांहीं वेळां हलत नाहीं असें वाटतें. कांहीं वेळां तो अडखळतो, तर कांहीं वेळां इतक्या तीव्र गतीनें अडथळे ओलांडून जातो, कीं पाहणारा स्तब्ध होऊन जातो. लग्न ठरलेल्या वधूवरांना लग्नतिथीपर्यंतचा काल अडथळणारा, अडवणूक करणारा, हट्टी, परिस्थिति न ओळखणारा वाटतो. मृत्युदंड झालेल्या माणसाला अंतिम घटकेपर्यंतचा काल तीव्र वेगाचा वाटतो. राजकारणी लोक मात्र आपल्या

सोयीप्रमाणें कालाचा वेग ठरविण्याचा प्रयत्न करीत असतात. त्यांना असें वाटत असतें कीं, सर्व जगच्चक्र आपल्या योजनेप्रमाणें चाललेलें असतें. मनुष्य संकल्प करीत असतो, योजना ठरवीत असतो, पण कालपुरुष मनुष्यांचे प्रयत्न क्षुल्लक व क्षुद्र आहेत याची जाणीव आपल्या लहरीप्रमाणें करून देत असतो. मानवी कर्तृत्व प्रभावी मानून-सुद्धां दैव म्हणून कांहीं तरी न उमगणाऱ्या घटनांचा अर्थ लावण्यासाठीं मानावें लागतें. निदान आर्य संस्कृतींत दैव हें कार्याचें पांचवें कारण मानलें आहे. आम्हीं आमच्या भाग्यदेवतेचें स्वरूप कसेंही घडवीत असलों, तरी अखेरचा आकार कांहीं तरी अपौरुष तत्त्व ठरवीत असतें.

### चौथ्या खांबाचे प्रतिनिधी

आणि हे व असले विचार दिलिंग्डन हवाई बंदरांतील स्वागतगृहांत उभा असतांना माझ्या मनांत सारखे येत होते. पृथ्वीच्या आकाराप्रमाणें गोलाकृतीच्या दालनांत किती तरी स्त्री-पुरुष जमा झाले होते. या जमावांत सत्तेच्या सिंहासनाच्या चौथ्या खांबाचे प्रतिनिधी विशेष गडबडींत दिसत होते. गेल्या चोवीस तासांत आपण कसे गुंतलों होतों, कशी बातमी मिळविली, कसा खलिता लिहिणार, हाच त्यांच्या गप्पांचा विषय होता. चार माणसें जमलीं म्हणजे 'गोष्टी वधू धनांच्या' चर्चिल्या जातात. चार पत्रपंडित जमले म्हणजे बातमी कशी शिज-विली, अगर मिळविली, अगर बनविली याचाच विचार होतो. या पत्र-पंडितांत परदेशी बातमीदारांबरोबर देशी बातमीदारही होते. अर्थात् देशी-परदेशी हा फरक रंगानेंच दिग्दर्शित होत होता. कारण पोषाखानें सर्वच परदेशी होते. किंबहुना देशी पोषाखांत हिंदी बातमीदार म्हणजे व्यापारांत महाराष्ट्रीयाइतकाच विरळा, तितकाच विस्मयकारक. जमा-वांतील स्त्री-पुरुषांचे पोषाख पाहिल्यावर हा देश दरिद्री आहे हें कोणाला

खरेंही वाटलें नसतें. उपस्थित स्त्रीजन लग्नसमारंभाच्या रुबाबांत होता. किंबहुना दिल्लींतील राजकीय वर्तुळांत वावरणाऱ्या स्त्रिया पोषाखाच्या बाबतींत तरी जगाचें नेतृत्व स्वीकारतील असेंच कोणी म्हणेल. कॅमेरा-वाले तर डझनावर होते आणि कदाचित् त्याचमुळें अनेकांच्या पोषा-खांत नीटनेटकेपणा दिसत होता. अनेक त्यांतल्या त्यांत नीटनेटकेपणा कसा तरी आणण्याचा प्रयत्न करीत होते. आणि हळूच सांगतों, मींही थोडासा प्रयत्न केला. पण गबाळी कोट केवळ हात फिरविल्यानें इस्त्रीचा होत नाहीं अगर जाडजूड खादीचें धोतर सावरासावरीनें तलम बनत नाहीं!! चंद्रोदयाची वाट पाहत असतांना जशा तारका दिसतात, तद्वत् नारीजन दिसत होता. एवढ्यांत शेंडेनक्षत्राप्रमाणें विचित्रपणांत स्वभावाची सुसंगति दाखविणारा पोषाख केलेली व्यक्ति दालनांत प्रवेश करती झाली. ती म्हणजे राष्ट्रपति कृपलानी होत. मला बरें वाटलें. एक तरी आपल्यासारखा आहे, यामुळें आधार वाटला.

## माझा सुताचा हार

थोड्याच वेळांत राजेंद्रबाबू आले, व आम्ही तिघे बांकावर बसून पंडित नेहरूंची वाट पाहत होतों. घरून निघतांना घर धुंडून कधींमधीं काढलेल्या सुताचा हार पंडितजींना घालण्यासाठीं आणला होता. त्यावर नजर रोखून कृपलानी मला म्हणाले, ' पंडितजी या हारावर खूष होणार नाहींत म्हणून मलाच कां घालत नाहीं ? ' मी म्हणालों, ' लंडनची वारी करणारासाठीं हा आहे. यांत मान गुंतवावयाची असेल, तर एवढें दिव्य करावयास पाहिजे.' एवढ्यांत जमावांत गडबड सुरू झाली व मी उठून प्रवेशद्वाराजवळ गेलों. पंडितजी मोटरींतून उतरले; त्यांचें स्वागत करून सुताचा हार तर मीं घातलाच. अनेक स्त्री-पुरुषांनीं त्याचें स्वागत केलें. अनेकांनीं फुलांचे हार आणले होते.

त्यांचा स्वीकार पंडितजींनीं केला; पण गळ्यांत फक्त सुताचाच हार त्यांनीं ठेवला. आणि त्या हारांत अंगठा अडकवून ते बोलत होते व विचारमग्नही दिसत होते. त्यांच्या मनांत काय विचार चालले असतील याचा विचार मी करीत होतों! आणि एकदम सुमारें १५ वर्षांपूर्वीं घडलेली घटना माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिली. ऑगस्ट १९३१ चा महिना असावा. गांधीजी राजपुताना बोटीनें गोलमेज परिषदेला निघाले होते. त्याही वेळीं अगदीं मुंबई बंदरांत नांगरलेल्या त्या बोटीवर गांधीजींना विदा करण्यास जमलेल्या थोडया शेलक्या व शिष्टमंडळींत असण्याचें भाग्य मलाही लाभलें होतें. भारताचे एकमेव प्रतिनिधी म्हणून ते जात होते. लढयानंतर फोफावलेल्या आशांचें व आकांक्षांचें ओझें घेऊन ते जात होते. सत्याशिवाय त्यांना सहकारी नव्हता. सौजन्याशिवाय त्यांच्याजवळ शस्त्र नव्हतें. श्रद्धेशिवाय मार्गदर्शक नव्हता. ते सचिंत दिसत होते आणि अगदीं निघण्यापूर्वीं त्यांच्या हातांत गुर्जर कवि मेधावीचें काव्य देण्यांत आलें. हा प्याला कडू आहे पण तुम्हीच तो पिऊं शकतां हा त्याचा भावार्थ होता. त्यांच्याबरोबर त्यांचे अनेक सहकारी जाण्यास उत्सुक होते; पण कोणी घेतले गेले नाहीं. हिंदुस्थानचें भाग्य हिंदुस्थानांत निर्मित झालें पाहिजे असें म्हणत ते रवाना होत होते. त्याही वेळीं इतिहास झपाटयानें चालला होता. मात्र त्याचें क्षेत्र इंग्लंड होतें. एक मंत्रिमंडळ गडगडून दुसरें येऊं घातलें होतें. निवडणुकीच्या आरोळ्या ऐकूं येत होत्या. स्वराज्य व स्वातंत्र्य आलेंच–कांहीं महिन्यांचा प्रश्न आहे, असेंच सर्वांना वाटत होतें. लवकरच रात्र संपेल, दिवस उजाडेल या आशेत असतांच गजराजानें कमलवन उध्वस्त करून हाहाकार करावा, तसेंच या देशांत घडलें. झंझावाताप्रमाणें नादीरशाही अंमलानें हिंदुस्थान उध्वस्त केला. समरांत अजिंक्य ठरलेले महात्मा सभेंतील चाणक्य नीतीपुढें चकःश्रित्

ठरले. थोडक्यांत स्वराज्याचा सवदा पटला या विश्वासांत असलेलें राष्ट्र दिङ्मूढ झालें.

कदाचित् आणि कदाचित्च मी म्हणतों, नेहरूजींच्या मनांत गत इतिहास उभा राहिला असावा. आजही ते एकमेव प्रतिनिधि म्हणून जात होते. त्यांना सहकारी नेण्याची इच्छा होती. पण सहकारी जात नव्हते. सल्लागार हवे होते, पण सल्लागार जाण्यास तयार नव्हते. भारताचें भाग्य भारतांत तयार व्हावयाचें हें ठरलें असतांनासुद्धां ते भारताबाहेर जात होते. स्वातंत्र्याची किंमत अश्रु, घर्म व रक्त या मापांत राष्ट्रानें भरपूर दिली आहे याची जाणीव त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होती.

### भ्रूणहत्त्या करणारी सुईण ?

शौर्य, उदारता, बुद्धिमत्ता एवढ्यानें नेतृत्व पुरें होत नाहीं हा आधुनिक कालांतील कटु अनुभव आहे. गेल्या कांहीं वर्षांतील व विशेषतः गेल्या कांहीं महिन्यांतील व त्यांतल्या त्यांत गेल्या कांहीं दिवसांतील राजकारणांतील घडामोडी पाहिल्यानंतर बुद्धिबळांतील डावपेंचांवर केवळ मात करूं अशी खात्री कोणाला देतां येणार नाहीं. कोण तरी कुठें तरी लबाड्या ( sharp practices ) करीत आहे व तोंडचा घांस काढण्याचा प्रयत्न होत आहे असा संशय आज वातावरणांत पसरला आहे. भाषा अर्थासाठीं नसून स्वार्थासाठीं आहे असा अनुभव येत आहे. जन्मास येणाऱ्या बालकाला सुईणच गळा दाबून मारील कीं काय, अशी भीति आज अनेकांच्या मनांत उत्पन्न झाली आहे. जमीन म्हणून पाय टाकावा तर पाण्याच्या प्रवाहांत तो पडेल कीं काय असा संमोह उत्पन्न झाला आहे. आणि अशा या विचित्र परिस्थितींत पंडितजींनीं जाणें खरेंच योग्य आहे काय असें

अनेकांना वाटत आहे. ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं दोन्ही हातांनीं दोन्ही पक्षांना आश्वासनें दिलीं आहेत. उघड दिलींच आहेत व गुप्त दिलीं असल्याचा संभवही आहे. अर्धदृष्टि व्हाइसरॉय अदूरदृष्टि तर नाहींच नाहीं, पण दीर्घसूत्री मात्र निश्चित् आहेत.

उत्सवमूर्ति व अचलमूर्ति

इतक्यांत 'खामोश' 'खामोश' म्हणून मेघनाद झाला. विमानग्रह-अधिकाऱ्यानें ' उतारूंशिवाय ' इतरांनीं गजापलीकडे जाऊं नये म्हणून सूचना केली. पंडितजींनीं गर्दीतून विमानाकडे प्रवास करण्यास सुरुवात केली. त्यांच्याच नभोवाणींतील शब्दांत सांगावयाचें म्हणजे दैव त्यांना खुणावत होतें. ते एकट्याचेंच दैव घेऊन जाते तर फारसें नव्हतें; ते आपल्याबरोबर ४० कोटी लोकांचें दैव घेऊन जात होते. माझ्या शेजारीं उभा असलेल्या पत्रपंडितानें मला विचारलें, "तुम्हाला काय वाटतें ?" मीं सांगितलें, " आतां वाटण्याचा प्रश्नच राहिला नाहीं; आतां पाहण्याचा प्रश्न आहे. आमचा उत्साह व उतावीळपणा विलायतेंत जात असला तरी आमचा निश्चय व निग्रह येथेंच राहतो आहे हें त्यांतल्या त्यांत आमचें सद्भाग्य आहे. " त्यानें विचारलें, " याचा अर्थ ? " मी म्हणालों, " सरदार पटेल ही देवालयांतील अचल मूर्ति आहे; पंडितजी उत्सवमूर्ति आहे. सरदार म्हणजे निग्रह आहे व ' नाहीं ' केव्हां सांगावें हें त्यांनाच फक्त अवगत आहे. म्हणून नेहरू जाण्यांत धोका असला, तरी तितकें भिण्याचें कारण नाहीं ! "
मी भलताच मुत्सद्दी आहें अशी त्याची खात्री झाली असावी, म्हणूनच कीं काय त्यानें दुसरीकडे तोंड वळविलें !

एका मिनिटाची ‘ गुफ्तगूं ’

गेल्या ६ महिन्यांतील येथील राजकारण ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांना निश्चयी व कठोर मनुष्याची राजकारणांत किती जरूर आहे याची खात्री झाली आहे. जो कोणाकडे जात नाहीं त्याकडे लोक जातात; जो कोणाशींही बोलण्यास तयार नाहीं, त्याच्याशीं लोक बोलावयास जातात; जो काय पाहिजे हें सांगत नाहीं, त्यालाच लोक काय घ्याव-याची तयारी आहे हें विचारावयास जातात. या घटनांचा अर्थ आम्ही केव्हां समजणार ? आम्ही आमच्या गतीनें कां जाऊं नये ? आमची शक्ति आज आमचा आधार असतां आम्ही दुसऱ्याकडे कां पाहावें ? करूं तें राजकारण व बांधूं तें तोरण एवढा आत्मविश्वास उत्पन्न व्हावा अशी स्थिति असतां आम्हीं अधीरतेनें व अविवेकानें आत्मनाश कां करून घ्यावा ? आमचें स्वातंत्र्य आतां यापुढें कोणीं दूर ठेवूं शकत नाहीं. आम्हीं चालूं लागलों कीं थांबलेले आपोआप मागें येतील, अडत नाहीं याची जाणीव झाली कीं आडवे झालेले सरळ होतील. घटना परिषद् म्हणजे राष्ट्राचा स्वातंत्र्याकडे मोर्चा आहे. नकाशा काढून तो पास झाल्यानंतर कांहीं नदीचा प्रवाह सुरू होत नाहीं. नदी आपलें पात्र, आपला विस्तार व व्याप जातांजातांच ठरवीत असते. घटना परिषद् चालू असतांच नवचैतन्याचा प्रवाह वाहूं लागेल. कांहीं अडथळे तोडले जातील. कांहींना वळसा घालावा लागेल. कोठें गति स्तब्ध झाल्यासारखी दिसेल, कोठें दृष्टि ठरणार नाहीं, एवढा वेग येईल. कोणा म्हातारीच्या केरसुणीनें उफळणारा दर्या मागें हटणार नाहीं. हवाईदलाबरोबर आलेला जनसागर जय हिंद गर्जूं लागला. पंडितजींनीं राष्ट्रपति व राजेंद्र यांच्याशीं एक मिनिट गुप्तगूं केली. आमच्याशीं हस्तांदोलन केलें व सरदार बलदेवसिंगांचा हात हातांत घेऊन ते विमानाकडे गेले.

## दोन पंखे

विमानाचीं यंत्रें गर्जूं लागलीं; पण एक इंजिनचा पंखा चालेना. कोणी तरी म्हणाला, दोन्ही पंखे चालू झाल्याशिवाय हें उडणार कसें? दुसरा म्हणाला, एक जोरानें चालू झाला म्हणजे दुसरा आपोआप चालू होईल आणि जणूं कांहीं होणाऱ्या व होत असलेल्या घटनांचें सूचक म्हणून एक पंखा जोरानें थोडा वेळ चालल्याबरोबर दुसराही सुरू झाला व निमिषांत विमान भूमीपासून अलग झालें, २–३ मिनिटाच्या आंत अदृश्य झालें. हा लेख प्रसिद्ध होण्यापूर्वीच लंडनचा अध्याय समाप्त झालेला असेल. या ४–५ दिवसांत काल किती वेगानें पुढें जाईल हें सांगतां येत नाहीं. कदाचित् तो आम्हाला मागेंही नेईल. कारण लंडन ही नेहमींच हिंदुस्थानच्या आशेची स्मशानभूमि ठरली आहे. इच्छिलें नाहीं तें भेटावें व अपेक्षिलें नाहीं तें अनुभवाला यावें, हा आतांपर्यंतचा इतिहास आहे. एकत्रित केलेली शक्ति तेथें विखुरली जाते व निश्चय निष्फळ ठरतो. तथापि लंडनचा मोह जगांतील अनेक राजकारणी पुरुषांना होतो. अध्यक्ष वेल्सची करुणावस्था लंडनलाच झाली. लीग व कॉंग्रेस आपलीं धुणीं लंडनला धुणार असतील, तर एक महान् दुर्दैव आहे. आज देशांत प्राणहानि होत आहे व त्या जोडीला परदेशांत मानहानि होणार असेल तर–तर या देशाच्या दुर्दैवाची मर्यादा नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. आणि ही विचारतंद्री चालू असतांच कोणी तरी कामगार 'चलो यार लंडनमे' म्हणून गीत गात होता. त्याला काय होत आहे याची क्वचित् कल्पना होती. पण सामान्य माणसाला काय वाटतें याचें तें प्रातिनिधिक स्वरूप होतें. मीही मोटरींत बसतांना आमच्या स्नेह्यांना म्हणालों, 'चलो यार लंडनमें.' अबोध उत्साह ही आयुष्यांतील एक मोठी शक्ति आहे, नाहीं का?

७

## गोटीराम भैया यांचें शब्दचित्र

असेंब्ली सभागृहांत पुण्यांतील वर्तमानपत्रें चाळीत असतां, गोटीराम भय्या एकाएकीं निवर्तले ही बातमी वाचली. मार्चच्या पहिल्या आठवड्यांत निवडणुकीच्या तुफानी दौऱ्यांत कांहीं तास मी पुण्यांत होतों. त्या वेळीं भय्याची गांठ पडली होती. निवडणुकीची गोष्ट काढतांच भय्यानें पाव शतक परिचित असलेल्या आवाजांत "कंप्लेट" काम झालें आहे असें सांगतांच मला आनंद झाला. पुण्यांतील कॉंग्रेस-उमेदवारांबद्दल भूमिगत चाललेला अप्रशस्त व अप्रामाणिक प्रचार

मला कळला होता. गैरसमजाची आग वणव्यासारखी पेटून अद्याप विझलेली नव्हती. कार्यकर्ते व कमिटया उदासीनता व उद्वेग यांच्या छायेंत झुरमुळलेल्या दिसत होत्या, नियामक मंडळ हिरीरीनें काम करतांना दिसत होतें. तथापि कुठें तरी, कोणाचीं तरी मनें खटकत असल्याचा भास होत होता. आणि म्हणून भय्याच्या आश्वासनानें 'मंडई विद्यापीठ' तरी तरफ सांभाळून आहे याबद्दल आनंद वाटला.

गेल्या पाव शतकाच्या अनेक घटनांनीं परिपूर्ण असलेल्या माझ्या सार्वजनिक जीवनांत गोटीराम भय्या ही व्यक्ति मीं कधीं क्षुल्लक मानली नाहीं व ती मनानें अगर मानानें, तसेंच तपानें अगर तनानें क्षुल्लकही नव्हती. १९२० सालीं प्रथम भय्याची ओळख झाली. असहकारितेच्या त्या प्रभातकाळीं भय्याची ती भव्य देहयष्टि, विस्तृत भालप्रदेश व त्यामुळेंच कदाचित् रागावून खालीं बसलेलें त्याचें नाक, त्याची पहिलवानी पेशाची वागणूक व पहांटेपासून दिवस वर येईपर्यंत पायीं अगर सायकलवर बसून, हातांत तिरंगी झेंडा घेऊन "देशाशीं वणवा लागला, जन हो खादी वापरा" ही त्यांची सतत चाललेली घोषणा, या पुण्यांतील तत्कालीन इतिहासांतील नमूद करण्यासारख्या गोष्टी होत्या व राजकारणांत नुकतेंच पदार्पण केलेल्या आम्हांला भय्या म्हणजे एक कौतुकाचें स्थान होतें. पुण्यांतील मंडई शक्तिकेंद्र होतें, गांधीभक्तीचें तीर्थ होतें, निगर्वी जनसेवेचें निवासस्थान होतें. त्या वेळच्या मंडळींतील प्रमुख म्हणजे अहमदभाई तांबोळी हे होत. अहमदभाई म्हणजे बिनबोल पण बिनमोल कार्यकर्ते. मंडईची ती मंगलमूर्ति होती. हिंदु-मुसलमान दोन्हीं जमातींना त्यांच्याबद्दल आपलेपणा वाटत होता. गोटीराम भय्या म्हणजे त्यांचा उजवा हात होता. पिकेटिंगच्या खटल्यांत त्यांना झालेली निर्दय शिक्षा, नंतर मी व भय्यानें तुरुंगांत जाऊन म्युनिसिपल निवड-

णुकीसाठीं त्यांची मिळविलेली संमति, त्यांची निवड, मंडईतील अनेक संस्मरणीय सभा, ' रावबहादूर लल्लूभाई हे कॉंग्रेसचे उमेदवार नाहींत ' हें मी सभेंत बोलतांच उडालेली दंगल व माझ्यासभोंवतीं भय्यानें केलेलें कडें, फेरनाफेर वादांत तीव्र मतभिन्नता असूनसुद्धां मी व मंडई यांच्यांत अखंड व अबाधित असलेली मैत्री या सर्व गोष्टी आज माझ्या स्मृतीपुढें तीव्रतेनें येत आहेत.

* * *

तीस व बत्तीस सालच्या चळवळींत भय्यानें खडतर तुरुंगवास सोसला. भय्या सरकारच्या मतें सामान्य मनुष्य म्हणून त्यास निराळा वर्ग व मी आणि अन्य कांहीं निराळ्या वर्गांत अशा स्थितींत आम्ही अनेक वेळां एकाच तुरुंगांत असून भेटूं शकलों नाहीं, बोलूं शकलों नाहीं. परंतु बेचाळीसच्या चळवळींत हें सर्व बदलून टाकलें गेलें. नऊ ऑगस्टला सुप्रभातीं मुंबईच्या सरदारगृहाला वेढा घालणाऱ्या पोलिसांनीं माझ्या व जेधे यांच्या पाठीवर राहून शिवाजीनगर येथेंच आम्हांला पकडलें व सरळ येरवड्याला नेलें. दारांतच संभाजी जेलर व भय्या उभे होते व दोघेही म्हणाले कीं, " आम्हांला आतांच पकडून आणलें आहे. " त्या दिवसापासून तों मे १९४४ पर्यंत म्हणजे भय्याची सुटका होई-पर्यंत भय्या मजबरोबर येरवडा इंडस्ट्रियल स्कूल, साबरमती व नाशिक या सर्व ठिकाणच्या तुरुंगांत होता. आणि मीं, म्हटल्यास वशिला खर्च करून, भय्याला ' ए ' क्लास डिटेन्यू म्हणून ठेवण्याची व्यवस्था केली होती.

तुरुंगांत भय्याची खोली म्हणजे एक मंदिर असे. समोर बागशाही, आंत अनेक देवतांचीं चित्रें व अनेक भक्तिविषयक ग्रंथ व शरीरांत ज्याप्रमाणें आत्मा निद्रिस्त असतो म्हणतात, त्याप्रमाणें या ग्रंथांच्या

गानांत 'शांभवी' होती. नित्य रात्रीं भय्या आपल्या खंजीरीवर थाप मारून, भक्तिमार्गाचा पुकार करून ज्ञानी व आर्त अशा दोन्ही स्थानबद्धांना आपल्याभोंवतीं बोलावीत असे. सहजानंद स्वामीसारखा ज्ञानमार्गी, सानेगुरुजींसारखा भक्तिमार्गी, लवकर सुटका व्हावी म्हणून भजनांत भाग घेणारे कित्येक आर्त, माझ्यासारखे भजनादि गोष्टींची टवाळी करणारे टवाळ, भय्याच्या खोलींत जमत. ब्रह्मानंदांचीं पदें, कबीरांचे दोहे, तुकारामाचे अभंग हे तर भय्या म्हणेच व त्याबरोबर स्वकृत अशी काव्यरचना भय्या गाऊन दाखवी. इंडस्ट्रियल स्कूलच्या वसाहतींत आम्ही असतांना कित्येक साम्यवादी व समाजसत्तावादी युवक तेथें होते. त्यांना मी भय्याच्या चेहऱ्याचें व कार्ल मार्क्सच्या चेहऱ्याचें साम्य दाखविलें व याही कारणामुळें या नास्तिक समाजांतील कांहीं सज्जन भय्याच्या भजनमंडळींत मधून मधून सामील होऊं लागले. भय्याच्या भजनास रंग येण्यासाठीं व भक्तीस प्रादुर्भूत होण्यासाठीं कैलासपतीला प्रिय असलेल्या दोन द्रव्यांची आवश्यकता असे व त्यांची अडचण पडूं न देण्याविषयीं मला दक्षता घ्यावी लागे.

पुण्याहून आम्हा पंधरा मंडळींना साबरमति तुरुंगांत नेलें, तेव्हांचा प्रसंग मला आठवतो. आमच्या बरोबरचें सामान तपासल्याशिवाय आंत जातां येणार नाहीं असें सांगतांच भय्यानें मजकडे धांव घेतली; कारण त्याच्या सामानांत या चिजा भरपूर होत्या. जेलच्या आंतल्या बाजूस आमच्या स्वागतासाठीं दादासाहेब मावळंणकर चहाची तयारी करून बसले होते. प्रसंग बांका होता. तथापि मोठ्या युक्तीनें भय्याच्या चिजा मी सगळ्या पहारेकऱ्यांच्या रांगेतून फाटकाची सरहद्द ओलांडून निवासस्थानापर्यंत सुरक्षित नेल्या. तेथें असतांना भय्यानें आपल्या गाण्यानें व भजनानें साबरमती तुरुंगांत सर्व कैद्यांचीं मनें आकर्षून घेतल्यानें

भय्याला आवश्यक असलेल्या बिदागीची कमतरता पडली नाहीं आणि साबरमतीहून ज्या वेळीं पुन्हां आमची रवानगी नाशिकास झाली, त्या वेळीं सर्व राजबंद्यानीं निरोप देतांना जीं भाषणें केलीं, त्यावरून भय्याच्या लोकप्रियतेबद्दल आमच्यापैकीं कांहींना थोडा हेवाच वाटला.

* * *

नाशिकचा तुरुंग म्हणजे रामचंद्रांनीं आपल्या पदक्षेपांनीं पवित्र केलेली भूमि आहे. कोणाला ठाऊक त्याच ठिकाणीं असलेल्या वृक्ष-राजींत बसून अगर गोदावरी परिसरांत हिंडत असतांना प्रभु रामचंद्रानें मानवशत्रु दशाननाचा निकाल करण्याचा मनसुबाही केला असेल. माझ्या खोलीच्या एका बाजूस जेधे व दुसऱ्या बाजूस भय्या अशी योजना सहज झाली होती. मोठ्या पहांटेस उठून चार पांच तास मी लिखाण करीत असें व त्यांत व्यत्यय येऊं नये म्हणून हे दोघे सन्मित्र दक्षता घेत असत. १९४४ च्या सुरुवातीपासून महिनेचे महिने तुरुंगांत गेल्या-मुळें जुने व नवे अनेक कार्यकर्ते थोडे निराश व थोडे कंटाळलेले होते. सुरुवातीचा उत्साह मावळत चालला होता. कित्येकांचा अभ्यासूपणा झिजत चालला होता. खिलाडू वृत्ति तिरसटपणाला वाव देऊं लागली होती. मनमोकळेपणावर चिडकेपणाचा कबजा बसत चालला होता. कांहीं दहा पांच माणसें सोडलीं, तर एकंदरींत मनःप्रवृत्ति उदासीन होत होती. सहजानंदाच्या चतुःसूक्तीवरील विवेचनांत रस घेणारा श्रोतृ-वृंद संपत आलेला होता. नाना विषयांवर व्याख्यानें व्हावींत म्हणून काढलेली माला बैठकीपुरतीच शिल्लक राहिली होती; पण आमच्या भय्याचा भजनी क्लब नेदादीप्राप्रमाणें अखंड तेवत होता, गंगेच्या प्रवाहाप्रमाणें वर्धिष्णु झाला होता आणि मीही त्या मंडळींत सामील होत होतों.

१९४४ चा मार्च महिना होता. महाशिवरात्र होती. त्या दिवशीं 'राज्यशास्त्रविचार' या पुस्तकाचें लिखाण संपविण्याचें मीं ठरविलें होतें व तो प्रसंग समारंभरूपानें करावा असें आमच्या मित्रमंडळींत ठरलें होतें. शिवरात्रीला अनुरूप असा प्रसाद म्हणजे सर्वांना शांभवी देण्याचें मुक्रर झालें व याला आवश्यक असणारी सर्व सामुग्री आणण्याचें कार्य आमच्या सकलगुणसंपन्न "पांडुरंग" ( उत्पात )नें करावें असें ठरलें. पांडुरंग म्हणजे आमच्या तुरुंगजीवनांतील ललकाऱ्याच होय. सुटकेची बातमी तोच आणी व कोणाला काय पाहिजे तें आणण्याचें चातुर्य त्याच्याच अंगीं होतें. दीडशें माणसांना "राज्यशास्त्रविचार" ग्रंथ-समाप्तीनिमित्त भरपूर शांभवी पाजण्याचें श्रेय भय्यानें घेतलें ! आणि योगायोगाची गोष्ट अशी कीं, या ग्रंथप्रकाशनाच्या वेळीं, म्हणजे गेल्या गांधीजयंतीला, भय्यानेंच पुढाकार घेऊन स्वखर्चानें पेढे आणून गोडी आणली.

* * *

आणि आज हा दिलेदार सहकारी नाहींसा झाला आहे. व्यासाप्रमाणें खादी ही कामधेनु आहे असें कंठरवानें सांगणारा एक निस्सीम खादी-भक्त मृत्यूनें हिरावून नेला. फैजपूर काँग्रेस अधिवेशनासाठीं पुण्याहून पायीं प्रवास करणारा हा यात्रेकरू जीवनयात्रा संपवून चुकला आहे. अनेक वर्षें अनेक वेळां कारागृहांत काढून पोलादी श्रद्धेचा हा राष्ट्रभक्त मृत्यूनें मृदु करून टाकला. माझ्या मंडई विद्यापीठाचा आद्य स्नातक आज "सा विद्या या विमुक्तये" हें महान् तत्त्व आचरत आचरत दिवंगत झाला आहे. भजनाच्या वेळीं भय्याच्या चिरपरिचित आवाजांत ऐकलेले त्याचे शब्द अद्यापि माझ्या कानांत घुमत आहेत, "इस गाडीसे जानेवाले, चलो तुमारी बारी है।"

—आणि आपली वेळ येतांच भय्या निघून गेला. एक सन्मित्र, एक अनुयायी, एक नागरिक, काळ्या रात्रींही हांकेस ओ देणारा, शरीराचा व कीर्तीचा संरक्षक–याला आज मी मुकलों आहें. भय्या, सर्व महाराष्ट्रातर्फें तुला माझे शतशः प्रणाम !

८

## अथ विमानमार्गेण—

अनंत आकाशांत भराऱ्या मारणाऱ्या पक्षांबद्दल एके काळीं मानव-जातीला वाटत असणारा हेवा आतां वाटण्याचें कारण नाहीं. तसेंच कोठल्याही योजनेबद्दल ती अव्यवहार्य आहे हें दाखविण्या-करितां ती केवळ कल्पनेची भरारी आहे असेंही म्हणणें आतां चुकीचें ठरेल. शास्त्रांचा शोध व मानवजातीनें सर्व तऱ्हेच्या साधनांत व सामुग्रींत केलेली प्रगति पाहतां किती तरी शब्दप्रयोग बदलावे लागतील, किती तरी जीवनविषयक अनुभव अर्थहीन म्हणून सोडावे लागतील व

किती तरी दृष्टिकोनांबाबत दुरुस्ती करून घ्यावी लागेल. आणि हे व असे गंभीर विचार मला सुचण्याचें कारणही तसेंच होतें. जमिनीवरून हजारों फूट उंचीवर प्रवास करीत असलेल्या टाटा कंपनीच्या विमानांत मी होतों !

कॉलेजांत असतांना कालिदासानें रघुवंशांत राम व सीता यांनीं विमानांतून जोडीनें केलेल्या प्रवासाचें वर्णन वाचलें होतें. तसेंच विरही यक्षानें मेघाला दूत करून आकाशासारख्या अफाट मार्गांतून जातांना वाट चुकूं नये म्हणून सांगितलेल्या खाणाखुणा रसिकतेचें वय संपत आलेलें असतांनासुद्धां स्मरणग्रंथांतून ढळून पडल्या नव्हत्या. रामाप्रमाणें मी जोडीनें प्रवास करीत नव्हतों किंवा कोठल्याही विरहगताचें दूतकाम माझ्याकडे नव्हतें. या दरिद्री देशांतील कोट्यवधि रुपयांचा संबंध असलेल्या विषयांबाबत व त्यांचा निर्णय करण्याबाबत नेमलेल्या कायदेमंडळाच्या समितीच्या कामाला मी जात होतों. आणि प्रसंग म्हणून आकाशमार्गानें जाणें प्राप्त झालें होतें.

## कांटे आणि—

टाटा कंपनीच्या तिकिटघरांत " पंचपंच उषःकाले " ज्या वेळीं मीं हजर झालों, त्या वेळीं तेथील थाटमाट पाहिल्यानंतर भोळ्या बाळूसारखी माझी स्थिति झाल्यास नवल नाहीं ! भिंतीवर हिंदुस्थानचा नकाशा चित्रमय काढला होता. मुंबईंत टांकसाळ असल्यामुळें पैसे बाहेर पडत आहेत असें चित्र दाखविलें होतें, तर दिल्लीला खुर्चीवर बसलेल्या सरकारी अधिकाऱ्यासमोर फायलींचा प्रचंड ढीग व लाल फितींचा झुपका दाखविला होता ! सिंध-हैद्राबादला हूर दरवडा घालीत आहेत असें दाखवून जणूं मुस्लिम लीगचें धोरण ओळखून चित्रित केलें होतें ! त्याचबरोबर कोठल्याही स्वातंत्र्यवीराला वाईट वाटूं नये म्हणून

नेपाळच्या सरहद्दीवर एका हातांत कुकरी व दुसऱ्या हातांत नुकतेंच कापलेलें माणसाचें मुंडकें घेतलेला शिखावान् हिंदुधर्माचा भाग्य-विधाता गुरखा काढला होता! या नकाशाकडे मी बराच वेळ पाहत होतों; पण तेथील अधिकाऱ्यानें "तुम्ही उतारू आहांत का?" असें जरा रुबाबांतच विचारल्यानें माझी विचारतंद्री भग्न झाली. कदाचित् माझा गांवरान पोषाख पाहून कोणी तरी येथें आलेला इसम असे त्याला वाटलें असावें. मीं 'होय' म्हटलें व माझ्या कातडी बॅगकडे बोट दाखविलें. सदहू बॅगवर अदूर व अधूर दृष्टि असणाऱ्यांनाही मी कोण व माझा हुद्दा काय हीं दाखविणारीं अक्षरें ठळकपणें अधिक धोरणी चिरंजीवांनीं काढून घेतलीं होतीं. अर्थात् तीं पाहतांच अधि-काऱ्याच्या वागण्यांत 'हृदयपालट' झाला हें दिसून आलें. रेल्वेंत जितकें वजन मोफत नेतां येतें तितकेंच येथें असावें असें समजून अस्मादिकांनीं सामान घेतलें होतें आणि त्याचें वजन केल्यानंतर जेव्हां अधिक पैसे मागितले, तेव्हां कळलें कीं बेडिंगला पडणारी किंमत दिल्लीपर्यंत हंशील म्हणून द्यावी लागणार! आणि यानंतर जेव्हां त्यानें मला स्वतःलाच कांट्यावर उभें राहण्यास सांगितलें, तेव्हां वजनावर हंशील मागणार कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली! राजकीय वजन झटकन चढतें व उतरतें; पण शारीरिक वजन लवकर उतरत नाहीं हें तर उघड आहे. तुरुंगांत असतांना काळा टोपीवाले कैदी आपलें वजन कमी व्हावें म्हणून धांवतात अगर अन्य कांहीं औषधें घेतात व त्याला कांहीं तरी कालगत लागते. येथें तर निमिषार्धांत वजन व्हावयाचें होतें. पुढें कांटा, अंगावर कांटा, आणि अधिक हंशील पडल्यास पाकिटा-वरही कांटा असा हा बांका प्रसंग होता! तथापि कुलदैवतेचें स्मरण करून मी त्यावर चढलोंच! शेवटीं वजन संपल्यावर जेव्हां तो कांहीं

बोलला नाहीं, तेव्हां फार आनंद झाला. या धांदलींत हातांत घेण्याची डॉक्युमेंट बॅग वजन न करतांच राहिली व ती तशीच मी पुणेरी सफाईनें हातांत घेऊन वर ज्या झपाट्यानें मंडपांत प्रवेश करतों त्या झपाट्यानें कंपनीच्या बसमध्यें बसलों. आपल्या शिताफीबद्दल मी मनांत खूष होतों, पण एवढ्यांत माडभर उंचीचा, एक गज रुंदीचा एक इंग्रज हातांत अशीच बॅग घेऊन कांट्यावर उभा राहिला व त्याचेही कांहीं अधिक पैसे कंपनीनें घेतले नाहींत; हें पाहून आपण केलेला पराक्रम हा निव्वळ बावळटपणा होता हें ताबडतोब लक्षांत आलें.

—गुलाब !

मुंबईच्या महालक्ष्मीला मोठ्या पहांटेला डावी घालून आमची गाडी सांताक्रूझच्या विमानगृहाजवळ आली. तेथें चहाची व्यवस्था होती. बिस्किटांचा ढीग होता. पण हें फुकट का विकत याचा कयास लागेना; म्हणून अस्मादिकांनीं फक्त चहाचाच स्वीकार करून पुनः पुनः बिस्किट घ्या म्हणून आग्रह करणाऱ्या परिचारिकेला ‘ कमी खावें ’ या मताचा आहें, असें दाखविलें ! बरोबर साडेसहा वाजतां उतारूंनीं विमानाकडे जावें असा तुताऱ्यानें आम्हांला आदेश दिला. सुमारें पंधरा इसम–स्त्री व पुरुष–आम्ही जोडलेल्या शिडीवरून विमानांत बसलों. अनेक वेळां आकाशांतून जातांना विमानें पाहिलीं होतीं; पण आज तें जवळून पाहण्याचा प्रसंग आला होता. एखाद्या प्रचंड माशाप्रमाणें त्याचें स्वरूप होतें. आंत बसमध्यें बसण्याची सोय असावी त्याप्रमाणें खुर्च्यांची व्यवस्था होती. जोड खुर्च्यांच्या सात रांगा व एकेरी खुर्च्यांच्या सात, अशा एकवीस उतारूंची सोय होती. खुर्चीवर बसल्याबरोबर यंत्र सुरू झाल्याचा आवाज सुरू झाला व विमान जमिनीवर सुमारें अर्धा मैल पुढें गेल्यावर तें जमिनीपासून

अलग झालें. विमानांत उतारूंची सोय पाहण्यासाठीं नेमलेल्या दोन परिचारिका उतारूंना कानांत घालण्यासाठीं कापूस देत होत्या. त्यांचा तो निळा पोशाख, पावडरनें शुभ्र झालेलें वदन व लिपस्टिकनें लाल केलेले ओंठ पाहिल्यानंतर कोणाही वेदाभ्यासजड माणसाचें हृदय क्षण-भर 'काव्यमयच' झालें असतें; व हा आकाशमार्गांतील प्रवास असल्याकारणानें मेघदूतांतील "ईषत् शामा, शेष विस्तार पांडु" ही पंक्ति मनांत आठवली. फरक फक्त "ईषत् शामा" याऐवजीं इषत् रक्ता एवढाच करावयास पाहिजे. विमानाची घरघर एवढी चालू होती, कीं कुजबुज करणें म्हणजे आझाद मैदानावर बोलणें ठरत होतें! या परिचारिका अगर पऱ्या, जेव्हां विमान जमिनीपासून वर जाऊं लागलें, तेव्हां 'पट्टा बांधा' म्हणून सांगत होत्या व उतारूंना कळावें म्हणून उतारूंच्या अगदीं कानाजवळ जाऊन त्यांना सांगणें भाग पडत होतें. कित्येक रसिक उतारू ऐकूं आलें नाहीं असा भाव करीत व त्यामुळें ही कथा अधिक 'कपोलकल्पित' ठरे! जेथें इंजिनचा भाग आहे त्या दारावर विजेच्या प्रकाशांत "*Fasten The Seat-belt*" असा आदेश पाहिल्याबरोबर खुर्चीला असलेला पट्टा मीं बांधून घेतला. ज्यांना तें जमत नसे, त्यांना पट्टा बांधण्याचें काम या परिचारिका करीत व दृष्टिसुखाबरोबर ईषत् स्पर्शसुख घेण्याचेंही भाग्य कांहीं उतारूंना लाभे. मी तितकासा आधुनिक नसल्यानें व समाजवादी नीतींत मुरला नसल्यानें स्वातंत्र्य जसें स्वतः मिळवावें तसें हें बंधनाचें कामही मीं स्वतःच केलें. उखळीला श्रीकृष्ण बांधावा तसे सर्व उतारू आपआपल्या खुर्चीला बांधले गेले होते! विमान खूप उंच गेल्यानंतर मग हें बंधन आम्हीं सोडलें. जणूं कांहीं पूर्ण विलासासाठीं या बंधनकारी मेखलाच टाकून दिल्या. आणि आतां खऱ्या वायुयानाच्या प्रवासाला सुरुवात झाली.

जवळील कांचेच्या तावदानांतून खालीं दृष्टि टाकावी तर निर-निराळ्या रंगांच्या चिंध्यांनीं तयार केलेली गोधडी जशी दिसावी, तशीं खालील शेतें दिसत होतीं! मोठमोठ्या मैदानांत लहान लहान वारुळें पसरलीं असावींत, तशीं शेतें दिसत होतीं. अगदीं किनाऱ्यावरून आम्ही जात होतों. नदीमागून नदी समुद्रामध्यें उड्या घेतांना दिसत होती. कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें "पिबत्यसौ पाययतेच सिन्धुः" हें वस्तुतः नजरेला येत होतें. एखाद्या बहुशाखा असलेल्या वृक्षाची सांवली भर उन्हांत दिसावी, त्याप्रमाणें मोठी नदी व तिला मिळणारे लहान लहान प्रवाह दिसत होते. रेल्वे लाइन तर रोमरेखेप्रमाणें भासत होती, कांहीं शेतांतून औतकामें चाललेलीं अस्पष्टपणें हालचालींवरून अनुमा-नितां येत होतीं. तासातासानें विमानवाहक कार्डावरून आपण कोठें आहोंत, किती उंचीवर आहोंत, किती वेगानें जात आहोंत हें कळवीत होता. तसेंच बाहेरचें उष्णतामानही कळवीत होता. दहा हजार फुटां-वरून ताशीं १७५ मैलानें आपण जात आहोंत, आतां आपलें विमान सुरतेवर आहे, बाहेर उष्णतामान १९ आहे व बरोबर ८। ला अहमदा-बादला पोंचूं अशी ग्वाहीही त्यांत दिली होती. बाहेर नयनमनोहर दृश्यें जीं कल्पनेलाही करतां येणार नाहीं अशीं दिसत होतीं. आणि आंत तुम्हांला चॉकोलेट पाहिजे का, विमान लागलें का, कोलनवॉटर पाहिजे का वगैरे प्रश्न आपल्या हास्यवदनानें परिचारिका विचारीत होत्या. बाहेर शुभ्र ढगांना बाजूला सारून पुष्कळ वेळां, त्यांच्यावर मात करून अनेक प्रसंगीं त्यांच्याखालून जाऊन 'साधनानामनेकता' हा एकच मार्ग साध्य गांठण्याचा आहे, याचा वस्तुपाठ विमानवाहक देत होता. आंत बाहेरील शुभ्र ढगाप्रमाणें या दोन परिचारिका विद्युल्लतेप्रमाणें

इकडून तिकडे जात–येत होत्या. आणि इतक्यांत जणूं कांहीं विद्युल्लते-मागें वादळ यावें त्याप्रमाणें बाहेर काळे ढग दिसूं लागले. पावसाच्या सरी पडूं लागल्या आणि प्रदर्शनांतील पाळण्याप्रमाणें विमान क्षणांत खालीं तर क्षणांत वर होऊं लागलें. बोर्डावर पुन्हा ‘ पट्टे बांधा ’ असा आदेश झळकूं लागला. पांच मिनिटांच्या आंत उतारूंपैकीं बहुतेक कासावीस झाले. किंचित् ओकाओकी सुरू झाली. परिचारिका तत्परतेनें इकडून तिकडे जात होत्या. स्मेलिंग सॉल्ट, कोलन वॉटरच्या पट्टया बांधत होत्या. मलाही वाटलें कीं मला विमान लागेल आणि त्यांच्या दाईपणाचा अनुभव घेण्याचा कोमल प्रसंग लाभेल. मला कांहींच झालें नाहीं. अगदीं स्थाणुरयं पुरुषः सारखा मी निर्विकार होतों. रसिकते-साठीं कांहीं करावें असेंही आतां वय नव्हतें. शिवाय असें कांहीं केलें तर कोणी तरी गेस्टॅपो ही नवलकथा तिखटमीठ लावून पुण्यपत्तनापर्यंत पोंचवावयाचा, हीही भीति होती. दहा मिनिटेंपर्यंत या वातावरणांत विमानानें प्रवास केला व ८। च्या सुमारास कळकीचें बेट जसें दिसावें त्याप्रमाणें अहमदाबादची नगरी गिरण्यांच्या उंचउंच चिमण्यांनीं गज-बजलेली दिसूं लागली. साबरमती नदी शहरामधून दुथडी भरून चालली होती; आणि विजेच्या कारखान्यावर असणारा साबरमती जेल, जेथें कांहीं काळ मीं वास्तव्य केलें होतें, त्याचेही तट दिसत होते. युद्ध-कालांत तुम्ही मालकांशीं झगडा न केल्यास साबरमती सोन्याची होईल, अशी वल्लभभाईंनीं घोषणा केली होती. आणि वस्तुस्थिति तशीच आहे. कोटयवधि गिऱ्हाइकांना नग्न–अर्धनग्न ठेवून गिरणीमालकांनीं आपलीं उखळें पांढरीं केलीं, ही गोष्ट जगजाहीर आहे. श्रीमंतीनें आलेला उन्मादच जणूं कांहीं साबरमतीच्या दुथडी भरून वाहणाऱ्या पाण्यानें दिसत होता. “ दूरस्थ पर्वतः रम्यः ” हें खरें असलें, तरी अहमदा-बादेंतील घाण वस्ती दहा हजार फुटांवरूनसुद्धां दिसत होती. जेथें

सत्याग्रहाश्रम, तेथेंच काळ्या बाजाराचें विद्यापीठ, जेथें सर्वसंगपरित्यागी महात्मा, तेथेंच गरिबांची चिंधी लुबाडून घेणारे महाभाग असावेत, ही गोष्ट, जग हें द्वैतांनीं भरलेलें आहे, एवढेंच सांगणारी आहे.

" भूमिगत झालों ! "

अहमदाबाद शहरावरून विमान–तळावर उतरत असतांना अशा तऱ्हेचे विचार आल्यावांचून राहिले नाहींत, ही गोष्ट मात्र खरी आहे. विमान खालीं येत असतांना पुन्हा पट्टे बांधा असा आदेश आला व थोडयाच मिनिटांत आम्ही " भूमिगत " झालों ! अहमदाबाद विमानतळावर आम्हांस न्याहरी मिळाली व तींत काय होतें हें सांगून सनातनी वाचकांना धक्का देण्याचा माझा उद्देश नाहीं. पण एवढें दिसून आलें, कीं प्रवासी हिंदु बहुतेक मुंजेप्रणीत हिंदु आहेत. उपाहार-गृहाच्या बटलरनें माझा बावळट पोशाख असून सुद्धां नम्रतेनें कुर्निसात केलेला पाहून त्याला बक्षिसी दिली. थोडयाच वेळांत आम्ही पुन्हा आकाशमार्गी झालों. मुंबई ते अहमदाबादपर्यंत एका बाजूला जमीन व एका बाजूला समुद्र व आम्ही आकाशांत असें विधान होतें. आतां एका दृष्टीनें चारी बाजूंना जमीन व एका दृष्टीनें आठी दिशांना अनंत आकाश, असें विधान होतें. अरवलीसारखे मोठमोठे पर्वत दिवाळींतील किल्ल्याजवळ मुलें जसे डोंगर रचतात, त्याप्रमाणें दिसत होते. राजपुतान्यांतील खेडीं निराळ्या रचनेचीं होतीं. बहुतेक खेडयांत मोठे तलाव दिसत होते. उजव्या हातानें उदेपूर मागें टाकून आम्ही चाललों होतों. उदेपूर मीं अनेक वेळां पाहिलें असल्याकारणानें कांहीं गोष्टी सहज लक्षांत आल्या. क्षणांत आम्ही जयपूरला आलों. म्हणजे जयपूरवर आलों. रेखाबद्ध व सुंदर गालिचा असावा त्याप्रमाणें जयपूर शहर

वरून दिसत होतें. आणि आमचें विमान पाहतां पाहतां ताशीं १७५ वेगानें दिल्लीकडे झेंप घेत होतें. दिल्लींतील परिचित वस्तु दिसूं लागल्या. तो पुराणा किल्ला, तो कुतुबमीनार, ती सेक्रेटरियटची इमारत, तें सभागृह हळूहळू दिसूं लागलें. प्राचीन वैभवाचीं व वीरकृतींचीं शहरें व प्रदेश आम्हीं मागें टाकले. आधुनिक जग आम्ही जवळ करीत होतों. रजपुतांच्या वैयक्तिक शौर्याच्या कथा आतां इतिहासजमा आहेत, त्यांच्या शूर राजांचे वंशज घोड्यांचा उपयोग स्वारीऐवजीं रेससाठीं करीत आहेत! दिल्ली जिंकल्याशिवाय सोन्याच्या ताटांत जेवणार नाहीं, मृदु शय्येवर झोंपणार नाहीं अशी प्रतिज्ञा केलेले आज दिल्लीच्या प्रचलित राजसत्तेचे अंकित झाले आहेत. त्यांचे राजवाडेही व्हॉइस-रॉयच्या राजवाड्याच्या आसपास वसलेले आहेत. तलवारीच्या खण-खणाटाऐवजीं सूचना-उपसूचनांचा आवाज येथें आज येत आहे. स्वातंत्र्याचे मनसुबे होण्याऐवजीं कोणत्या जातीला किती नोकऱ्या मिळतात, याचे डावपेंच चालू आहेत. मरणांत अहमहमिका होण्या-ऐवजीं अधिक दास्य कोण करतो याच्यांत ती आहे. आणि हें सर्व आपण योग्य करीत आहों असा अहंकार मात्र कायम आहे! मराठ्यांचे पूर्वज दिल्ली सर करण्यासाठीं आले होते, तहनामे करण्यासाठीं आले होते, 'शापादपि शरादपि' या न्यायानें तक्त घेण्यास अगर फोडण्यास आले होते आणि आतां त्यांचे वंशज बजेटच्या भाषणांत तीन पैशांचें कार्ड दोन पैशांना करावें, हें विनविण्यास आले होते. हे व असले विषण्ण विचार माझ्या मनांत दहा हजार फूट उंचीवरून खालीं उतरत असतांना उमटत होते. विमान जमिनीला लागलें, मनांतील विचारांनीं वस्तुस्थितीची जाणीव करून दिली अन् एवढा तरी फायदा दीडशें रुपये खर्चून केलेल्या प्रवासानें झाला!

## ९

## 'आम्हांला मतें असतील काय ?'

" अर्धनग्न, अर्धपोटी, पूर्ण अज्ञानी, पूर्णपणें निराश असें वर्णन ज्या विभागांतील शेतकऱ्यांबद्दल करतां येईल अशा विभागांत मी चोवीस तासांपूर्वी होतों आणि अगदीं हेंच वर्णन तीस वर्षांपूर्वींच्या रशियांतील परिस्थितीला लागू पडतें. या अवनत, असंघटित अवस्थेंतून आजचा प्रभावी व पराक्रमी रशिया कसा निर्माण झाला ! दीन व दुबळा शेतकरी तीस वर्षांत मानी व स्वाभिमानी कसा बनला ! अडाणी व अज्ञानी, धर्मभोळया व वेडगळ समजुतींचा दास आज पुरोगामी व

प्रगतिप्रिय अशा आघाडीचा कसा झाला ? रशियाच्या यशाचें रहस्य कशांत आहे ? ही जादूगिरी कोणी केली ? ” हे शब्द २२ फेब्रुवारी रोजीं लाल सैन्याच्या वार्षिक दिनानिमित्त मुंबई येथें भरलेल्या सभेंतील अध्यक्षपदावरून भाषणाच्या सुरुवातीस मीं काढले होते. सदहू समारंभ कोटांतील कामा इन्स्टिटयूट हॉलमध्यें होता. सभेला शेंकडों नागरिक उपस्थित होते आणि विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे सदहू सभेस ब्रिटिश सैनिक व नाविक दलांतील सैनिकही मोठ्या प्रमाणांत हजर होते. सोव्हियट मित्र संघानें सदहू समारंभ घडवून आणला होता. सोव्हियट संघ म्हणजे, कांहीं लोकांच्या मतें, कम्युनिस्ट लोकांचें रिक्रूट-भरती करण्याचें साधन आहे. सोव्हिएट तत्त्वज्ञान अगर सोव्हियट तंत्र संपूर्णपणें मान्य नसूनही त्यांतील ग्राह्य भाग स्वीकारण्यास हरकत नसावी, असें मानणारा असा एक मोठा वर्ग आहे.

### कम्युनिस्टांची ‘ देशसेवा ! ’

हिंदी कम्युनिस्टांनीं ४२ च्या आंदोलनांत जी भूमिका घेतली, त्यांच्या पुढाऱ्यांनीं जीं निवेदनें प्रसिद्ध केलीं, त्या पक्षांतील सभासदांनीं जी ‘ देशसेवा ’ केली, त्यामुळें कॉंग्रेसमधील सर्वसामान्य कार्यकर्ते कम्युनिस्ट पक्षाविरुद्ध संतापून आहेत. कांहीं कांहीं कॉंग्रेस-कार्यकर्त्यांच्या सभांतून व परिषदांतून कम्युनिस्ट पक्षाशीं व कार्यकर्त्यांशीं संपूर्ण असहकार करावा असेही ठराव झालेले आहेत व कांहीं कॉंग्रेस–कार्यकर्ते तर कम्युनिस्टांशीं सामाजिक संबंधही ठेवूं नये असें म्हणतात. या सगळ्या प्रवृत्तींचें व मतप्रणालीचें प्रतिबिंब महाराष्ट्राच्या राजकारणांतही पडलें आहे. असें असूनसुद्धां या समारंभाचें अध्यक्ष-स्थान स्वीकारण्याचें मीं पूर्ण विचार करून व सहकाऱ्याचा सल्ला घेऊन ठरविलें होतें. या संधीचा संपूर्ण फायदा घेऊन कम्युनिस्टांची

'लोकयुद्ध' ही भूमिका कशी चुकीची आहे हें दाखविण्याचा मीं निश्चय केला होता. कम्युनिस्ट पक्षानें देशाविरुद्ध व काँग्रेस-विरुद्ध जो मोठा गुन्हा केला होता, तो म्हणजे प्रस्तुत युद्धाला त्यांनीं लोकयुद्ध म्हणून नैतिक पाठिंबा दिला ! प्रत्यक्ष युद्धांत हा पक्ष सामील झाला नसेल, त्यानें रिक्रूटही पुरविले नसतील, अन्य सर्व बाबतींत काँग्रेसशीं जुळवून घेतलें असेल, राष्ट्रीय सरकारची मागणी, हिंदु-मुसलमान ऐक्य, पुढाऱ्यांची मुक्तता या बाबतींत पद्धतशीर व नेटानें चळवळही केली असेल, पण यामुळें त्यांचें वरील पाप कमी झालें असें मानण्यास मी तयार नव्हतों. आणि म्हणून सुटून आल्या-पासून त्यांच्याशीं असहकार न करतां त्यांची लोकयुद्धाची भूमिका चुकीची कशी, हें प्रत्येक संधि मिळतांच मी स्पष्ट करीत होतों. समा-रंभाचा हा पाहुणा काय बोलेल ही साधारण कल्पना त्यांना होती. सोव्हियट सैन्याच्या समारंभाला त्यांना काँग्रेसमन हवा होता. मात्र मुंबईच्या जाणत्या जनतेपुढें जाहीरपणें काँग्रेसची युद्धविषयक भूमिका स्पष्ट करावयाची होती.

## रशियाच्या यशाचें रहस्य

उपस्थित समाजांत मुंबईतील सर्व पक्षांचे लोक तर होतेच. परंतु विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे सुमारें शंभर एक ब्रिटिश सैनिक होते. हें लक्षांत घेऊन मी म्हणालों कीं, "शस्त्रास्त्रांपेक्षां कणखर मनोवृत्ति हीच यशाची खरी मनोवृत्ति आहे आणि कणखर मनोवृत्ति तयार होण्यासाठीं देशांतील जीवन अनुरूप असावें लागतें. फ्रान्स शरण गेला, पण फ्रान्सपेक्षां रशियावर अधिक जोरानें हल्ला झाला असतां-सुद्धां रशिया पराभूत झाला नाहीं. त्याची इच्छाशक्ति नमली नाहीं, मान वांकली नाहीं. याचें रहस्य ओळखलें पाहिजे. लढणाऱ्या प्रत्येक

सैनिकाला, राष्ट्रांतील प्रत्येक नागरिकाला देश आपला आहे असें वाटतें. राष्ट्रांतील संपत्ति आपण निर्माण केली आहे हा अभिमान त्यांना आहे व तिची वांटणी न्याय्य प्रमाणांत होईल असा अनुभव व खात्री आहे. राज्य लोकांचें आहे व तें वस्तुतः लोकांसाठीं आहे, हा विश्वास रशियन सेनेच्या पराक्रमाचें कारण आहे. देशावर हल्ला झाला, तर सामान्य जनता देशोधडीला लागेल, देशाचा जय झाला तर सामान्य जनतेचा तो विजय आहे हें गणित तेथें आहे म्हणून तेथें तें लोकयुद्ध आहे. तेथें कोणी सोळा रुपये पगार व खाना, कपडा-लत्ता मोफत अशा घोषणा करून सैनिकभरती करीत नाहींत. आपल्या देशांत हें लोकयुद्ध म्हणणें हास्यास्पद आहे. उत्पत्ति, स्थिति व लय तीनही कसोट्यांवर पडताळून पाहतां हिंदुस्थानच्या दृष्टीनें चालू युद्ध लोकयुद्ध नाहीं. युद्ध जाहीर करतांना लोकांना विचारलें नाहीं. युद्धाच्या निकालानंतर लोकांच्या ऐवजीं ब्रिटिश साम्राज्यवाद्यांचा पाश दृढत्तर होणार आहे. हिंदुस्थानला ताबडतोब स्वातंत्र्य दिल्यास व तें लोकशाही स्वातंत्र्य झाल्यास हिंदुस्थानांतील जनता रशियन जनतेप्रमाणें लढेल, शालीवाहनाप्रमाणें स्वातंत्र्य मातीचीं माणसें करील. ही किमया स्वातंत्र्याचें अमृतच करूं शकेल. आजसुद्धां चर्चिल जें आमचें आहे तें आम्ही सोडणार नाहीं असें म्हणत असतां, युद्धोत्तर हिंदु-स्थानला स्वातंत्र्य मिळेल हें कसें तर्कशुद्ध ठरतें ? खुद्द चर्चिलसुद्धां नवें इंग्लंड निर्माण व्हावें अशा मताचे नाहींत. ज्या इंग्लंडमधील पांसष्ट टक्के जमीन आठ टक्के लोकांच्या हातांत आहे, जेथें वार्षिक उत्पन्नापैकीं ऐशीं टक्के उत्पन्न, पंधरा लोकांना मिळतें, तें इंग्लंड राहावें यासाठीं श्रम, घाम आणि अश्रु खर्चीं टाकण्यास चर्चिल तयार झाला आहे. प्रिमरोझ इंग्लंड, डर्बी रेसमध्यें भाग घेणारें इंग्लंड, एका

शब्दांत सामाजिक विषमता असलेलें इंग्लंड चर्चिलला राखावयाचें आहे. स्वातंत्र्य मिळाल्यास व खरें जनतेचें स्वातंत्र्य मिळाल्यास म्हणजे आर्थिक लोकशाही युद्धोत्तर नक्की निर्माण होणार आहे असा विश्वास उत्पन्न झाल्यास, इंग्लंडमधील जनता अधिक उत्साहानें लढेल असें इंग्लिश पुढारी म्हणत आहेत. येथें स्वातंत्र्य मिळाल्यास आमचे मामा ( माझ्या आधीं मामा वरेरकर यांचें भाषण झालें होतें ) शेलार-मामासारखे लढतील ! भांडवलशाहीसाठीं, साम्राज्यशाहीसाठीं, सोळा रुपयांसाठीं जनता लढणार नाहीं. आणि जोंपर्यंत जनता या मनःस्थितींत आहे, तोंपर्यंत हें लोकयुद्ध असूं शकत नाहीं. ”

ब्रिटिशांचे राज्य नको !

भाषण चालू असताना चर्चिलविरुद्ध केलेल्या कोटया ब्रिटिश सैनिकांना विशेष पसंत पडल्याचें दिसत होतें, कॉंग्रेसवाली मंडळी खूष दिसत होती, कम्युनिस्ट मित्र किंचित् गोंधळल्यासारखे दिसत होते. “ पराक्रमी रशियन फौजांनीं हिटलरी जर्मनीचा नाश करून बर्लिनवर लाल झेंडा लावल्यानें त्याचें कार्य पुरें होणार नाहीं, तर साम्यवादी आदर्शाचा जय होऊन चर्चिली-इंग्लंडचा जेव्हां पराभव होईल व इंग्लंडवर जेव्हां खऱ्या साम्यतेचा झेंडा उभारला जाईल, तेव्हांच युद्ध समाप्त होईल व खरी जागतिक शांतता सुरू होईल. ” खालीं बसतांच सभेच्या सबंध वातावरणांत बदल झाला हें उघड होतें. आणि प्लॅटफॉर्मवरून खालीं आल्यावर दहाबारा ब्रिटिश सैनिक माझ्याभोंवतीं गोळा झाले व त्यांपैकीं एकानें माझें अभिनंदन करून म्हटलें, “ तुमचें व्याख्यान सुंदर ( *Beautiful* ) झालें. ” मीं म्हटलें, “ तें कांहीं सांगतां येत नाहीं; पण रोखठोक ( *Blunt* ) झालें एवढें खरें. ”

“ आम्हीं सैनिकांनीं तुमच्या देशासाठीं काय करावें ? ” एकानें विचारलें. उत्तर देणें सोपें नव्हतें, पण द्यावयास पाहिजे होतें. मीं म्हटलें, “ तुम्ही जेव्हां स्वदेशीं जाल, तेव्हां तुमच्या देशबांधवांना सांगा कीं ब्रिटिशांचें राज्य हिंदुस्थानला नको आहे, व जेव्हां निवडणुकीचा प्रसंग येईल तेव्हां जो उमेदवार हिंदी स्वातंत्र्याचा पुरस्कार करील, जो पक्ष हिंदी स्वातंत्र्यासाठीं उभा राहील त्याला मतें द्या. ” एकदम पांच-सहा जणांनीं “ *Shall we have votes at all ?* ” ( खरेंच, आम्हांला मतें असतील का ? ) असा प्रश्न केला आणि या प्रश्नाला माझ्याजवळ उत्तर नव्हतें.

कोणाचे श्रम आणि कोणाला आराम ?

ज्या सैनिकांनीं जीवित तृणवत मानलें, घरेंदारें सोडून जगाच्या सरहद्दीपर्यंत जे गेले व ज्यांनीं मृत्यूशीं अखंड झगडा चालू ठेवला, त्यांना आपल्या देशाचें भवितव्य ठरविण्यांत कांहींच अधिकार नसावा हें काय ? देशाच्या संरक्षणासाठीं राष्ट्रीय भावना उत्तेजित करणारा भांडवलवाला वर्ग व त्याचे पुढारी संकट संपतांच पूर्वपदावर जाणार का ? कोणाचे श्रम व कोणाला आराम ? कोण मरणार व कोणाचें हित साधणार ? चर्चिलच्या युद्धकालीन घोषणा खुद्द त्याचे देशबांधवसुद्धां खऱ्या मानायला तयार नाहींत, असा त्याचा अर्थ नाहीं का ? दोन राष्ट्रांतील दोन जनतेमध्यें वैर नसतांना सामान्य माणसें असामान्य हिरीरीनें लढून पुन्हां एकदा फसणार हाच याचा अर्थ नव्हे का ? जो लढला, जो श्रमला, त्याला कांहींच अधिकार नाहीं, म्हणजे जगांत कृतज्ञता नाहीं, असेंच नव्हे का ? आणि हे विचार माझ्या डोक्यांत चालू असतां मागील युद्ध जिंकल्यानंतर अध्यक्षीय निवडणुकीस उभा राहून पडलेल्या प्रसिद्ध फ्रेंच मुत्सद्दयाचे–क्लेमनकोचे शब्द आठवले.

मागील महायुद्ध त्यानें जिंकलें हें सर्वमान्य होतें; पण युद्धानंतर झालेल्या निवडणुकींत पडल्यानंतर इंग्लिश पंतप्रधान लॉइड जॉर्ज हा त्यांना म्हणाला, " काय ही देशाची कृतज्ञता ! " त्यावर क्लेमनकोनें उत्तर दिलें, " *My friend, there is no gratitude in politics* " ( मित्रा, राजकारणांत कृतज्ञतेला स्थान नाहीं. ) आणि आज चर्चिलनें निवडणुकी जुलैमध्यें घेऊन क्लेमनकोच्या सिद्धांताला मान्यताच दिली आहे. लक्षावधि लोक वंचित केले गेले आहेत आणि राजकारणांत असेंच घडतें. जे निष्ठावंत असतात, ते खर्ची पडतात. जे धोकेबाज असतात, कार्यसाधु असतात, ते साधून जातात. ' हनुमानको तेल और बिभीषणको लंका ' हा राजकारणांतला जुना सिद्धांतच आहे ! !

१०

## माणुसकीचा मान झाला नसता !

" अशा रीतीनें तुम्ही आंत आलां याबद्दल तुम्हांला लाज वाटत नाहीं काय ? "

" होय. मला अतिशय लाज वाटते, पण तितकेंच सार्वजनिक कामाचें महत्त्व असल्यामुळें मी आंत शिरलों आहें. " वरील प्रश्नोत्तरें दि. ५ मे १९४६ रोजीं रात्रीं मध्यान्हींचे सुमारास कऱ्हाड स्टेशनवर उभे असलेल्या मेल गाडींतील एका सेकंड क्लासच्या डब्यांत झालीं. दि. ५ मे रोजीं कऱ्हाड येथें प्रचंड जनसमुदाय जमला

होता. कृष्णा व कोयना प्रेमसंगमावर जनता व भूमिगत कार्यकर्ते यांचा संगम झाला होता. दोन–अडीच वर्षांच्या अज्ञातवासांतून तावून सुलाखून निघालेले, जनतेला व ९३ कलमी सरकारला, दोघांनाही निरनिराळ्या अर्थानें ‘ हवे ’ असलेले अनेक कार्यकर्ते तेथें प्रगट व्हावयाचे होते, त्यांचा सत्कार व्हावयाचा होता. नदीतीराला लागून कऱ्हाडच्या नागरिकांनीं जणूं काय छोटें काँग्रेसचें अधिवेशनच भरलें आहे अशी व्यवस्था केली होती. प्रचंड जनसमुदाय लोटल्यामुळें कांहीं अव्यवस्थाही तेथें होती हें खरें. त्यांतच पांडु मास्तर बोलावयास लागल्यावर दूरध्वनिक्षेपक आवाज देईनासा झाला. कदाचित् पांडु मास्तरांच्या आवाजानें अधिक गर्दी जमेल असें तरी त्याला वाटलें असावें किंवा पांडु मास्तर तेथें आहेत हें पोलिसांना समजून येईल या भीतीनेंही कदाचित् तसें झालें असावें. तथापि रात्रीं दहा वाजेपर्यंत ती सभा चालूच होती व तिचें काम संपल्यावर मला पुण्यास येण्याची घाई होती. म्हणून मी कऱ्हाड स्टेशनवर आलों होतों.

त्या ऐतिहासिक सभेचें अध्यक्षस्थान अभिमानानें विराजित केलेला मी, त्या अपमानास्पद प्रश्नाला अत्यंत शांत चित्तानें वरीलप्रमाणें उत्तर दिलें,' हें अजूनसुद्धां मला खरें वाटत नाहीं. मी व शेंकडों माणसें सभा संपवून आपापल्या गांवीं जाण्यासाठीं स्टेशनवर आलों होतों. स्टेशनवरील अधिकाऱ्यानें दुसऱ्या वर्गांत जागा मिळेल असा भरंवसा धरून मला तिकिट दिलें होतें. इतकेंच नव्हे, तर जो पराक्रम, अंगदनीतीचा म्हणजे खिडकीवाटे प्रवेश करण्याचा, मीं केला, त्याचें सर्व श्रेय त्या बिचाऱ्या अधिकाऱ्यालाच होतें. दोन तीन मिनिटें मी व सदरहू अधिकारी व आणखी दोन तीन कार्यकर्ते या डब्यापासून त्या डब्यापर्यंत जागा शोधीत होतों व शेवटीं खालीं जागा रिकामी आहे असें पाहून आंतील

रतारू आंतून बंद केलेलें दार उघडत नाहींत अशी खात्री झाल्यावर, प्लॅटफॉर्मबाहेर उभ्या असलेल्या एका डब्यांत, अक्षरशः कार्यकर्त्यांच्या खांद्यावरून खिडकीमार्गें मीं प्रवेश केला होता. माझे पाय जमिनीला लागतांच चारी बाजूंनीं एकदम व अकल्पित वेढा पडावा अशी परिस्थिति निर्माण झाली ! त्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत खालीं तीन व वरती तीन याप्रमाणें झोंपलेले सहाही उतारू जीवित व वित्त यांवर संकट आलें असें समजून उभे राहून व उड्या टाकून घनघोर रणसंग्राम करण्याचा जणूं कृतनिश्चय केला आहे, अशा पवित्र्यांत उभे राहिले. रोमेलनें मनांत आणलें असतें तरी इतकी सफाईदार योजना अंमलांत आली नसती. सुदैवाची गोष्ट एवढीच कीं ते सगळे शस्त्रविरहित होते; पण अभावितपणें मजविरुद्ध संघटित झाले होते. तिसऱ्या वर्गाच्या गर्दीचा भरपूर अनुभव मला होता. तेथील उतारूंची मनोवृत्ति मला माहित आहे. आंत येतांना कितीही विरोध केला, तरी आंत आल्यानंतर त्यांचा आगंतुकपणा विसरला जातो व मापट्यांत भरलेलें धान्य जरा हलविल्यावर जसें खालीं बसतें, त्याचप्रमाणें गाडी चालू झाल्यावर त्यांतल्या त्यांत सर्वजण एकमेकांची सोय करून घेतात. कारण त्या वर्गात माणुसकी असते. तेथें खरी गर्दी असूनही जागा मिळते. तर या ठिकाणीं मुबलक जागा असूनही गर्दीची तक्रार केली जात होती.

“ या जागा रिझर्व केल्या आहेत. ” असें त्यांपैकीं एकानें ठासून मला सांगितलें.

“ होय, मला माहित आहे ! ” असें मीं नम्रपणें सांगितलें.

“ तुमचें सामान आम्हीं फेंकून देऊं ! ”

“ किंमतवान् असें माझ्याजवळ कांहींच नाहीं; फक्त मी व माझें

सौजन्य हेंच माझें सामान ! या सामानापैकीं एक तुम्हाला फेंकतां येणार नाहीं. " हीं प्रश्नोत्तरें इंग्रजींत होत होतीं व इच्छा नसतांनाही मला इंग्रजींत बोलावें लागत होतें. आणि सेकंड क्लासमध्यें मराठी बोलणें म्हणजे त्या मंडळींना तरी रेल्वे कायद्याविरुद्ध अपराधच वाटत होता ! ते रागानें बोलत होते, मी अगदीं शांतपणें उत्तरें देत होतों. अभिमन्यूची नीति स्वीकारण्याचा तो प्रसंग नव्हता. शिवाय अभिमन्यूचें आणि माझें वय सारखें नव्हतें; पण तरीही मी युधिष्ठिराची शांतता आणण्याचा प्रयत्न करीत होतों. या पहिल्या हिंसा-अहिंसा चकमकींत पहिला बळी त्यांपैकीं जी स्त्री होती ती पडली. त्या माउलीनें शांतपणें बर्थवर जाऊन तोंडावर पांघरुण घेऊन बाहेरील सृष्टि दृष्टीआड केली. स्टेशनमास्तरला बोलावून आतां मी तुम्हांला बाहेर काढतों असा त्या पांचांपैकीं एकानें दम दिला. " ज्यानें मला येथें आणून सोडलें तो मला कसा बाहेर घालवील ? " मीं आत्मविश्वासानें विचारलें. तेव्हां त्यांपैकीं एकानें माझी अक्कल बाहेर काढली. पण मीं शांतपणें सांगितलें, " मी शहाणपणाचा दावा मांडीत नाहीं. तसेंच महत्त्वाचें सार्वजनिक कार्य आहे तेव्हां मला गेलेंच पाहिजे. करीत आहें ही चूक आहे हें मलाही कळत आहे. पण तशींच कारणें आहेत म्हणूनच ती करीत आहें. " चकमकीचा दुसरा बळी पडला व वरच्या बर्थवरून उडी मारून आलेला गृहस्थ तितक्याच चपळाईनें वर गेला. तथापि शिल्लक असलेल्यांत एक मियाँभाई होते, असें त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें. त्यांनीं आपल्या 'खास' इंग्रजींत आणखी बोलण्यास सुरुवात केली, " मी सांखळी ओढीन ! "

मी म्हणालों, " तुम्ही सांखळी ओढली, तर गाडी थांबेल; पण हेंही तितकेंच खरें कीं मला घेतल्याशिवाय तुमची गाडी मला निरोप

देण्यास आलेले अनेक लोक जाऊं देणार नाहींत." मियाँभाईनें आपल्या डोक्यावर हात फिरविला. दाढींतूनही हात फिरविला व कदाचित् *Direct Action* च्या स्फूर्तीची ते वाट पाहत असावेत असें मला वाटलें. एवढ्यांत स्टेशनच्या अधिकाऱ्यानें, "तुम्हांला माहित आहेत का हे कोण गृहस्थ आहेत ते ?" असें मोठ्यानें त्याला विचारलें. तेवढ्यांत मी म्हणालों, "नांव सांगण्याचं कारण नाहीं. मी त्यांचा एक मित्र आहें व त्यांच्याबरोबर आनंदानं प्रवास करणारा सहउतारू आहें." गाडी चालू झाली. प्लॅटफॉर्मवर चिरपरिचित असे जयघोष होत होते. दोन बांकांच्या मध्यें तो मुसलमान गृहस्थ व मी असे एकमेकांसमोर उभे होतों व बाकीचे सर्व झुंजार आपापल्या शिबिरांत, म्हणजे बर्थवर जाऊन निजले होते. गाडी प्लॅटफॉर्मवर गेली. ओगलेवाडीचे दिवे आम्हीं मागें टाकले; परंतु माझ्या मित्रानें सांखळी ओढली नाहीं अगर अन्य कांहीं हालचालही केली नाहीं. एक दोन मिनिटांतच सदहू गृहस्थ वरच्या बर्थवर जाऊन आपल्या जागीं निजले. नंतर झालेल्या घटनांबद्दल किती काळ तरी मी विचार करीत दोन बांकांमध्यें घोंगडी पसरून त्यावर बसून राहिलों होतों. १९४४ च्या ऑगस्टमध्यें सुटून आल्यानंतर कुर्डुवाडीला घडलेला एक प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर पुनः पुनः दिसत होता. कुर्डुवाडी स्टेशनवर मद्रास उभी राहिली, त्या वेळीं तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत नियमित संख्येच्या जवळजवळ दुप्पट अधिक आम्ही होतों. गाडी थांबतांच दहा बारा वडार स्त्रिया, बरोबर लहानलहान मुलें व विविध आकारांचीं व रंगांचीं बोचकीं घेऊन आंत शिरल्या व आमच्या डब्याला त्यांनीं ब्लॅक-होलचें स्वरूप दिलें. खिडकींतून मी जवळ असलेल्या शिपायाला हांक मारली व त्याला तिकिट कलेक्टरला बोलविण्यास सांगितलें. तो म्हणाला,

" काकासाहेब, ही तुमची प्रजा आहे; गेले दोन दिवस जागा मिळत नाहीं म्हणून येथें पडून राहिले होते; पण तुम्ही म्हणत असाल तर तिकिट कलेक्टराला बोलावून आणतों. " तो मला ओळखत होता हें तर उघड झालेंच; पण त्याचबरोबर माझें कर्तव्य काय याची इतक्या मार्मिकपणें त्यानें मला समज दिली कीं मी काय करावें याबद्दल मला शंकाच राहिली नाहीं. मीं ताबडतोब तिकिट कलेक्टरला बोलावूं नकोस असें सांगितलें व डब्याला सभेचें स्वरूप देऊन पुरुष मंडळींनीं आळीपाळीनें उभें राहावें व स्त्रियांना जागा करून द्यावी अशी सूचना मांडली. आणि ती मान्य होऊन आम्ही उतारूंनीं भ्रातृभावानें प्रवास केला. केवळ हक्काची जाणीव ठेवली असती, तर त्या स्त्रियांना बाहेर काढतां आलें असतें व आमचा प्रवास क्षणभर व कणभर अधिक सुखाचा झाला असता. पण एका उच्च दर्जाच्या आनंदाला मात्र मुकलों असतों. या प्रसंगांची तुलना करीत व त्यांतून अनेक विचार-तरंग उद्भूत होऊन शेवटीं त्या सेकंड क्लासच्या डब्यांत दोन बांकांमध्यें घोंगडीवर मी झोंपी गेलों.

—आणि सकाळीं जागा झाल्यानंतर उतारूंपैकीं एकानें मला आपण होऊन बर्थवर बसण्याची विनंति केली व अत्यंत नम्रपणें नांव विचारलें. आतां संपूर्ण उजाडलें होतें. निरीक्षण करतांना असें आढळून आलें की, त्यांत एक कारवारी जोडपें होतें, एक मद्रासी गृहस्थ होता, एक पारशी सद्गृहस्थ, एक आमचे मियाँभाई व सहावे कोणी तरी प्रातर्विधीसाठीं बाहेर गेले होते. पारशानेंच मला जागा देऊन माझें नांव विचारलें. मी म्हणालों, " नांवाशीं काय आहे ! तुमच्यासारखाच मी एक उतारू आहें व समुद्रांत दोन लांकडें एकत्र यावींत व दूर व्हावींत तसेच आपण अर्धा-पाऊण तासाच्या आंत दूर होणार आहोंत."

तो म्हणाला, " ज्या शांततेनें व सभ्यतेनें तुम्हीं काल रात्रीं वागत होतां, त्यावरून तुम्हीं कोणी तरी मोठे गृहस्थ आहांत ही गोष्ट स्पष्ट होत आहे." मी म्हणालों, " शांतता व सभ्यता हीं कांहीं नेहमींच मोठेपणाचीं लक्षणें नसतात. शिवाय या वस्तु इतक्या स्वस्त आहेत, किंबहुना कांहींही किंमत न देतां त्या माणसाला बाळगतां येतात." आणि आमचें बोलणें चालू होतें, एवढ्यांत प्रातर्विधि उरकून सहावे गृहस्थ बाहेर आले. त्यांनीं ताबडतोब, " काकासाहेब, इकडे कोणीकडे ?" असें विचारून नमस्कार केला. मीं सांगितलें, " मी कऱ्हाडपासून या डब्यांत आहें." सदरहू गृहस्थ कर्नाटकातील एका महान् पुढाऱ्यांचे चिरंजीव होते. " अहो, मला काल कां सांगितलं नाहींत ? तुम्हांला जागा करून देऊन मी खालीं झोंपलों असतों." त्यानें तसें केलें असतें, याबद्दल माझी पूर्ण खात्री होती. बत्तीच्या अर्धवट प्रकाशांत त्यानें मला ओळखलें नाहीं हेंही खरेंच असलें पाहिजे. मी म्हणालों, " तूं तरुण आहेस. तुला विश्रांतीची अधिक आवश्यकता. मी खालीं निजलों यामुळें झोंप आली नाहीं असें थोडेंच झालें ?" नंतर मी कोण हें सर्व उतारूंना सांगितलें. ताबडतोब त्या सगळ्यांनीं दिलगिरी-प्रदर्शनाला सुरुवात केली. " तुम्ही नांव सांगितलें असतें, तर आपल्या संगतीचा लाभ घेतां आला असता; आपण नांव सांगितलें नाहीं, बरें नाहीं केलें." पारशी गृहस्थ तर बेळगांवचे मोठे व्यापारी असून मुंबईतील एका पारशी पुढाऱ्याचे आप्त होते व सदरहू आप्तानें माझ्याविषयीं फारच लोकमत चांगलें असल्याबद्दल आपल्याला सांगितलें असल्याचेंही त्यानें सांगितलें. पुनः पुनः नांव न सांगितल्याबद्दल अनेक वेळां खेद प्रगट केला. शेवटीं जें उत्तर द्यावें कीं नाहीं याचा बराच वेळ विचार करीत होतों तें देण्याचा विचार करून म्हणालों, " मी नांव सांगितलें असतें, तर तुम्ही जागा दिली असती,

सन्मानही केला असता. पण तो माझ्या पदवीचा व प्रतिष्ठेचा झाला असता. त्यांत माणुसकीचा मान झाला नसता. तुमच्यांत व माझ्यांत जें समान आहे तें मानव्य. तें मात्र अवमानित झालें, एवढेंच मला वाईट वाटतें." पुणें स्टेशन आलें. आम्ही सर्व उतरलों; माझें सामान तें काय ? एक चामड्याची पेटी. ती उचलण्यासाठीं हिंदु, मुसलमान, पारशी याच्यांत चुरस लागली. मी कोणालाच हा मान देण्यास तयार नव्हतों व सर्वांच्या नमस्कारांत, आलेकुम सलामांत मी शेवटीं सत्याचा व सभ्यतेचा विजय कसा सुखदायक व दीर्घकालीन असतो याचा विचार करीत स्टेशनबाहेर आलों.

११

## जुन्या बाजारांतील ‘लोकशाही’

पुणें हें अनेक गोष्टींप्रमाणें तेथील ‘ जुन्या बाजारा ’बद्दल प्रसिद्ध आहे. इतिहास संशोधनापासून ‘ १९४४ ’ पर्यंत अनेकविध चळवळीं-बाबत पुण्याचा लौकिक जितका व जसा आहे, त्याच प्रतीचा लौकिक पुण्यांतील जुन्या बाजारासंबंधीं आहे. १९२४–२५ सालपर्यंत हा जुना–बाजार आठवड्यांतून दोनदां शनिवारवाड्यासमोर व बाजूला भरत असे. अलीकडे कांहीं वर्षांपासून तो नदीपलीकडे भरूं लागला आहे. तथापि, या स्थलांतरानें त्याचें महत्त्व किंचितही कमी झालेलें

नाहीं. पूर्वीप्रमाणेंच अद्यापिही त्याचें विविध व विचित्र स्वरूप कायम आहे. ‘ जुना बाजार ’ हें नांव असून सुद्धां किती तरी नवीन वस्तु पूर्वी तेथें विक्रीस येतात. पूर्वीप्रमाणेंच वृद्ध माणसें नव्या व जुन्या वस्तूंच्या शोधार्थ त्या स्वस्त मिळतील म्हणून येथें येतात. एका पैशासाठीं एक तास घासाघीस करण्याची जुनी परंपरा अद्यापि त्यांनीं सोडलेली दिसत नाहीं. अद्यापिही साधारण वापरलेली वस्तु कमी जास्त रंगवून सजवून या बाजारात नवी म्हणून खपविली जाते. आजचे साहित्यिक जवळ जवळ हेंच करीत असतां, त्यांना मात्र कोणी फारसें बोलत नाहीं. उलट, जें नवीन छापलें तें नवीन समजूनच त्याचा प्रतिष्ठितपणें पुरस्कार केला जातो. आणि राजकारणांतही जुन्या चुकाच पुनः पुन्हां करण्याचा प्रयत्न स्पष्ट दिसत असतांही, नवीन तत्त्वज्ञानाची, नव्या प्रमेयाची विचारसरणी म्हणून त्याकडे कौतुकानें बोट दाखविण्यांत येतें ! पुण्यांतील जुना-बाजार म्हणजे ज्याला पाहिजेल ती वस्तु स्वस्त मिळण्याचें एक आशास्थानच आहे. लहानपणापासून गंमतीसाठीं, व प्रसंगीं एखाद्या वस्तूच्या खरेदीसाठीं व अनेक वेळां केवळ करमणुकीकरितां या जुन्या बाजाराकडे मी आकर्षिला जात असें. संसारांतील प्रत्येक वस्तु नवीन असावी ही आकांक्षा पुण्यांतील प्रत्येक सद्गृहस्थाची जरी असते, तरी त्याच्या अनेक गरजा जुन्या बाजारांतूनच तो भागवीत असतो. पुण्यांतील जुना बाजार हा उघड बाजार आहे, म्हणून कांहीं त्याची तुलना मुंबईच्या चोर बाजाराशीं करतां येणार नाहीं ! याचा अर्थ असा नाहीं कीं, चोरलेल्या वस्तु ‘कायाकल्प’ करून येथें मिळतच नाहींत ! आजकाल सर्वच वस्तु महाग व दुर्मिळ झाल्या आहेत. ‘ देशोद्धाराच्या योजना ’ सोडल्या, तर प्रत्येक वस्तु योग्य प्रमाणांत मिळत नाहीं. विशेषतः पुस्तकांच्या बाबतींत गेल्या चार पांच वर्षांपासून युद्धामुळें

विशेष अडचणी अनुभवाला येत आहेत. पुस्तकें विकत घेण्याचा माझा रोग जुनाच आहे. थोडेसे पैसे जादा वाटल्याबरोबर पुस्तकें विकत घेण्याचें माझें व्यसन हें अनेक वेळां 'गृहमंत्र्या'च्या टीकेचा विषय झालें आहे.

### जुना बाजार आणि आमची म्युनिसिपालिटी

आजही एका जुन्या पक्षकारानें किती तरी वर्षांपूर्वी त्याच्या केलेल्या कामाबद्दल अनपेक्षित रीतीनें कांहीं रक्कम आणून दिली होती. अंदाजपत्रकावर जरी पुस्तक लिहिलें असलें, तरी घरच्या अंदाजपत्रकांतील ' आय ' व ' व्यय ' या दोन्ही बाजूंचा अंदाज आजपर्यंत तरी मला बरोबर करतां आला नाहीं. अपेक्षिलेलें येऊं नये व अनपेक्षिलेलें यावें हा जसा अनुभव आहे, तसा अपेक्षिलेला सर्व खर्च होऊन अनपेक्षिलेला वाढता असावा हाही अनुभव आहे. तथापि, लक्ष्मी ही चंचल आहे म्हणून तिला तिच्या स्वभावाविरुद्ध स्थिर अगर स्थायी करण्याचा मीं कधींच प्रयत्न केला नाहीं. कदाचित् मला तो करतां येणार नाहीं असेंही असूं शकेल. आणि म्हणून वर लिहिलेली अनपेक्षित रक्कम, व तीं क्षुल्लकही नव्हती, हातीं पडतांच प्रथम 'इंटर नॅशनल पुस्तक संगहालयांत' गेलों व तेथें पाहिजेत तीं पुस्तकें न मिळाल्यानें कुठें तरी जावें म्हणून नव्या पुलाकडे एटी फीट रोडनें निघालों. साहजिकच ' कॉंग्रेस भवन ' वरून पुढें जात असतांना रस्त्यांतील गर्दीमुळें जुन्या बाजाराचा दिवस आहे हें लक्षांत आलें व लागलीच एखाद्या टांग्याचें घोडें संवयीप्रमाणें एखाद्या रस्त्याला वळतें, त्याप्रमाणें माझे पाय जुन्या बाजारांतल्या क्षेत्राकडे वळले. फारां दिवसांनीं मी तेथें जात होतों हें खरें; तथापि परिचित नसलेली अशी सर्व दुकानदार मंडळी माझें स्वागत करीत होती. या घटनेमुळें उत्पन्न होणारा ' अहंकार ' रूप

धरण्यापूर्वीच निकालांत आला. कारण मला कोणी पुढारी म्हणून बोलवत नव्हतें, तर गिऱ्हाईक या नात्यानें प्रत्येक जण पृच्छा करीत होता ही गोष्ट थोड्याच वेळांत लक्षांत आली. बसण्याच्या नव्या पाटापासून निजण्याच्या छपरी पलंगापर्यंत, अनेक वस्तूंचे विक्रेते हावभाव करून ओरडत होते. चिंध्याचिंध्या शिवून केलेले धडके कपडे, त्याच स्वरूपाचें वस्त्र अंगावर घालून विकणारे आपल्या उत्पादनाशीं जणूं 'सुसंगति' दाखवीत होते. गालावर तुरळक ठिकाणीं दाढीचे झुबके असलेला 'हसनअल्ली' बोहरी फुटक्या बादलीपासून बिलोरी आरशापर्यंत सर्व विसंगत गोष्टींचा समन्वय करून 'सर्वोदय' वादाचें प्रात्यक्षिक दाखवीत होता. या बाजाराच्या भावताला जुने पत्रे व जुने वांसे घालून हा जुना बाजार आहे हें व्यंजनेनें व कलात्मक दृष्टीनें म्युनिसिपालिटीच्या अधिकाऱ्यांनीं दाखविलेलें दिसत होतें. खुद्द बाजारांतील घाण व अस्वच्छता यांमुळें, या जागेची व्यवस्था म्युनिसिपालिटीकडे आहे, याचा निर्विवाद पुरावा तेथें दिसत होता. एका बाजूस मोटरी व एका बाजूला जनावरांचा बाजार, अशी योजना करून मनुष्य हा यंत्रापेक्षां सजीव पण जनावरापेक्षां निराळा हें दृश्य पुण्यांतील नगरपालिकेनें आपल्या रचनाकौशल्यानें सुंदरपणें दाखविलें होतें. आणि या जुन्या बाजारांत मानवी संसाराला अवश्य असणाऱ्या 'साहित्या'-बरोबरच ज्ञान 'साहित्या'चीं साधनें म्हणजे पुस्तकेंही होतीं.

## जुन्या बाजारांतलीं पुस्तकें

साहजिकच या ग्रंथभांडाराकडे मी गेलों. जुन्या बाजारांतून कांहीं प्रसंगीं, पण फार थोडे वेळां मीं पुस्तकें घेतलीं आहेत; पण आज काय झालें कोणास ठाऊक, त्या ठिकाणीं कांहीं तरी घ्यावें अशी बुद्धि मला झाली आणि मी त्या पुस्तकाच्या ढिगांतून एक एक पुस्तक पाहूं

लागलों. बाबिलोन शहरांत ज्याप्रमाणें अनेक भाषा बोलणारे लोक राहत असत, व परस्परांची भाषा न समजतांही व्यवहार करीत असत, तशीच थोडीशी स्थिति येथें होती; संस्कृत, मराठी, उर्दू, बंगाली, इंग्रजी, फ्रेंच इत्यादि नाना भाषांत लिहिलेलीं पुस्तकें पांडोबांच्या दुकानांत गुण्यागोविंदानें एका राशींत पडलीं होतीं ! शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रापासून पठ्ठे बाबुरावांच्या लावणीपर्यंत विषय असलेले ग्रंथ तेथें दिसत होते. परमेश्वर ज्याप्रमाणें दिक्कालातीत आहे, तद्वतच मजसमोर असलेली ही रास दिक्कालातीत भासत होती. निरनिराळ्या देशांतील व कालांतील ग्रंथकारांचे ग्रंथ येथें एका राशींत समन्वित होऊन पडले होते. ही रास चाळतां चाळतां एका ग्रंथावर माझी नजर गेली आणि एकदम विजेचा धक्का बसल्यासारखें मला झालें !

पुस्तक मागून नेणारे वकील !

१९३८ सालीं ‘ म्युनिक ’चा करार झाला, त्या वेळीं युरोपियन राजकारणांत ‘ एड्वर्ड बेनेस ’ ही व्यक्ति नामवंत झाली. झेकोस्लोव्हाकियन देशाचा हा मुत्सद्दी या म्युनिक घटनेपूर्वींपासून किती तरी वर्षें नात्सीवादापासून सावध रहा म्हणून सारखा युरोपला इशारा देत होता. मनानें व विचारानें खरा प्रजातंत्रवादी ज्याला म्हणतां येईल, असा हा मुत्सद्दी होता व आहे. मागील युद्धानंतर झेकोस्लोव्हाकिया हें राष्ट्र किती थोड्या वेळांत उन्नत झालें, याचें वर्णन पंडित नेहरूंनीं कौतुकानें केलेलें आहे. आणि मागील युद्धानंतर हा देश दुर्दैवाच्या चक्रांतून सुटून सुस्थितीच्या मार्गाला लागला, असेंच सर्वांना वाटत होतें. एका पिढींत प्राग शहरांतील नागरिकांना तीन राज्यसत्तांचे नागरिक होण्याचा मान मिळाला होता. युरोपच्या राजकारणांतील हें फासपद जाऊन हा देश व्हर्सायनंतर स्वयंशासित व स्वयंकर्तृत्ववान

झाला असेंच जगाला वाटत होतें. १९२० ते १९३७-३८ सालपर्यंत झेकोस्लोव्हाकियानें जी प्रगति केली आणि विशेषतः लोकशाही शासन-पद्धति खरोखर यशस्वी करून दाखविली, त्याचें कौतुक सर्वत्र होत होतें. आणि ह्या कर्तृत्वाचा मोठा भाग बेनेस यांचा होता. त्यांचें नांव जगभर आधीं विदित होतेंच. तथापि, चेंबर्लेननें म्युनिक करार करून झेकोस्लोव्हाकियावर जो अन्याय केला, त्या वेळचें बेनेसचें भाषण अनुपम होतें, " युरोपच्या शांतीसाठीं आज आम्ही बलिदान करीत आहोंत. हें बलिदान करण्यांत युरोपची शांति अढळ राहील, अशी थोडी जरी खात्री आम्हा झेक लोकांची असती, तरी याहीपेक्षां अधिक बलिदान करण्यांत आम्हांला जास्त आनंद वाटला असता. आमच्या बलिदानानें शांति येणार नसून युद्धच येणार आहे. तथापि लोकांनीं शांततेनें धीर धरून आपलें कर्तव्य पार पाडलें पाहिजे व लोकशाही-स्वातंत्र्य संरक्षिलें पाहिजे. आज नाहीं उद्यां लोकशाहीचा जय निश्चित होईल." हें भाषण वाचल्यानंतर त्याच वेळीं त्यांनीं लिहिलेलें 'लोकशाही' (*Democracy*) हें पुस्तक मीं विकत घेण्याचें ठरविलें व मुंबईला जाऊन विकत आणलेंही. तें आणल्यानंतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं पुण्यांतील एक वकील कामानिमित्त मजकडे आले आणि तें पुस्तक वाचण्यासाठीं घेऊन गेले. पुस्तक ही कांहीं सर्वशः व सतत आपल्याजवळ ठेवण्यासारखी वस्तु नाहीं. शिवाय, जर त्याच्या वाचनानें कोणाच्या ज्ञानांत भर पडत असेल, तर तें दुसऱ्याला दिल्यानें कोठें बिघडतें ? ज्ञानदान हें श्रेष्ठ नाहीं का ? सर्व पुस्तकें कांहीं सोन्यासारखीं बाळगून ठेवावींत अशा स्वरूपाचीं नसतात. कांहीं पुस्तकें बेकननें म्हटल्याप्रमाणें, बाजूला टाकावयाचीं असतात, कांहीं वाचून मनन करावयाचीं असतात व कांहीं आपले नित्य साथी, मार्गदर्शक म्हणून जवळ ठेवावयाचीं असतात. तथापि तीं कोणच्याही स्वरूपाचीं असलीं

तरी ' अर्थशास्त्रा 'च्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे तीं ' बहूपयोगी ' आहेत. म्हणजे एकानें अगर एकदां उपयोग केल्याबरोबर त्यांची उपयुक्तता संपत नाहीं. या स्थितींत आपल्याजवळची ग्रंथसंपत्ति नुसती अनुपयुक्त ठेवणें असामाजिक आहे हें तर उघड आहे. पण त्याचबरोबर वाचावयास दिलेलीं पुस्तकें परत मिळत नाहींत आणि संस्कृत सुभाषिताप्रमाणें ' परहस्ते गतं गतः ' असाच अनुभव येतो. पुस्तक मागून नेणारे वकील हे कांहीं राजकारणाचा अभ्यास करणारे नव्हते, राज्यशास्त्रांतली गोडीही त्यांना नव्हती. पण समाजांत कित्येक लोक असे असतात कीं, नवीन पुस्तक कोणाकडे पाहिलें, कीं त्यांना तें हवेंसें वाटतें. पुस्तकें ही खरी संपत्ति आहे, हें आपल्याकडे क्वचितच समजलें जातें. घरामध्यें शोभेच्या वस्तूसाठीं ऐपतीबाहेर लोक खर्च करतील, परंतु थोडया पण निवडक ग्रंथांचा संग्रह करून आपलें घर व मन सजवतील असें क्वचितच होतें. तथापि, कांहीं लोकांची संवय चांगलें पुस्तक दिसलें कीं मागावयाचें, ही वस्तुस्थिति आहे; तें न्याव-याचें व हरवावयाचें हा अनुभव आहे व परत करण्याची मागणी केली असतां त्रासिकपणें रागवावयाचें हा सर्वत्र परिचित असलेला इतिहास आहे ! पूर्वी अनेक वेळां हा सर्व अनुभव मला आला असतांनासुद्धां त्या गृहस्थाचा उत्साह पाहून सदरहू पुस्तक मीं त्यास दिलें.

मला धक्का कां बसला ?

बरोबर सात वर्षांनीं तें पुस्तक पांडोबांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्त-कांच्या राशींतून मला मिळालें ! या सात वर्षांत जगांत काय काय झालें याचा चित्रपट तें पुस्तक माझ्या हाताला लागतांच माझ्या डोळयांसमोर उभा राहिला. युरोपचीं लहानमोठीं लोकशाही व अन्य राष्ट्रें नात्सी लोकांच्या टांचेखालीं चिरडलेलीं नजरेखालून गेलीं. प्रत्यक्ष नात्सी

राज्यपद्धतीपेक्षां जास्त नियंत्रित केलेलें सामाजिक जीवन तथाकथित 'लोकशाही' देशांत उपलब्ध झालेलें दिसून आलें. प्रामाणिक विरोध म्हणजे राज्यद्रोह हें समीकरण प्रतिष्ठेला गेलेलें नजरेसमोर आलें. सहिष्णुता व सौजन्य या ज्या सद्गुणांवर लोकशाहीचें खरें जीवन अवलंबून आहे, त्यांचीं मृत्युगीतें कानांनीं ऐकलीं. लोकशाही म्हणजे शासितांच्या संमतीवर आधारलेलें शासन, हा सिद्धांत नामशेष झालेला दिसून आला. एका पक्षाची हुकुमशाही म्हणजे लोकशाही असा अर्थ नवीन भाष्यकारानें वर्णिलेला मीं ऐकला. ज्या पक्षांनीं, ज्या नेत्यांनीं, ज्या राष्ट्रानें हुकुमशाहीविरुद्ध प्रथमपासून आवाज काढला ते सर्व हुकुमशाहीचे पाठीराखे म्हणून हिणविले गेले, कारागृहांत टाकले गेले. या सात वर्षांत असत्य सत्य ठरण्याइतकी वेळ आली; देशभक्ति हा गुन्हा ठरला व स्वातंत्र्य म्हणजे मोठया राष्ट्राची गुलामगिरी असें गणित होऊन बसलें. जें स्वातंत्र्य नव्या विचाराची जननी, अभ्युदयाची कामधेनु व अस्मितेचा गौरव, तें आज अर्थशून्य ठरण्यापर्यंत वेळ आली. सर्वत्र नियमन व नियंत्रण प्रभावी ठरलें असून, व्यक्ति प्रतिष्ठेंत व प्रभावांत क्षणाक्षणाला झिजत आहे. व्यक्तीच्या महत्त्वाला लागलेला क्षय हीच जगांतील आज वाढ आहे. लोकशाही म्हणजे, व्यक्तीचा गौरव कायम राहून समाजाची प्रतिष्ठा व पराक्रम वृद्धिंगत करणारें संघटन, हें मान्य करण्यास कोणी आज तयार नाहीं. लोकशाही हा गेल्या सात वर्षांत कार्यक्षमतेच्या नांवावर जुना आदर्श ठरविण्यांत आलेला आहे.

आणि या सर्व घटनांचें प्रतिबिंब म्हणूनच कीं काय, हें लोकशाहीचें पुस्तक जुन्या बाजारांत विक्रीला येऊन पडलें होतें. आणि दुःखाची गोष्ट म्हणजे स्वामीत्वाच्या भावनेनें त्याजवर लिहिलेलें माझें नांव

अनेक रेघा काढून खोडून टाकण्याचा प्रयत्न केलेला दिसून येत होता. माझ्या नांवाखालीं आणखीही दोनचार नांवें तशींच खोडलेलीं होतीं, पण तीं वाचण्याचाही प्रयत्न मीं केला नाहीं. तें नांव खोडलेलें पान पाहून विचारांचें काहूर मनांत इतकें उठलें कीं, तेथें अधिक वेळ बसून सदरहू पुस्तक तेथें कसें आलें ही चौकशी करावी असें सुद्धां वाटलें नाहीं. जेथें लोकशाहीच जीर्ण व जुनी ठरली, तेथें या क्षुल्लक गोष्टीचें मी महत्त्व तरी कां मानावें ? मी उभा राहिलों. माझे आवतीं-भोंवतीं सर्व जीर्ण व जुन्या वस्तु इतस्ततः पडल्या होत्या हें खरें, पण माझ्यासमोर नदी वेगानें वाहत होती. नव्या पाण्याच्या प्रवाहाचा खळखळाट ऐकूं येत होता. जीवन हा एक प्रवाह आहे. कोणी सांगावें, या नवीन प्रवाहांतून नवीन चैतन्य येणार नाहीं म्हणून ? आणि याच मंगल कल्पनेशीं तन्मय होत मी घरीं परत आलों.

## १२

## शेजारीं चित्रशाळा आहे ना !

केल्यानें देशाटन, पंडित–मैत्री, सभेंत संचार होतो; तसेंच शास्त्र-ग्रंथविलोकन होऊन मनुष्यास चातुर्य येतें, अशा अर्थाची कविता क्रमिक पुस्तकांतून बहुतेकांनीं वाचली असेलच. अवलोकनासाठीं व अभ्यासासाठीं जनतेचें दुःख व दारिद्र्य न्याहाळण्यासाठीं, अज्ञान व अडाणीपणा अजमाविण्यासाठीं, या हतभागी देशांत प्रांताबाहेर जाण्याचेंसुद्धां कारण नाहीं. किंबहुना, प्रत्येक नगरांतून व प्रत्येक खेड्यांतून, प्रत्येक गल्लींतून व प्रत्येक चवाठ्यावर अनुभवाचा हा ग्रंथ

सर्वांना पाहण्यास मोकळा आहे. आणि हा पाहणें हा एक माझा व्यवसायच बनला आहे. प्रत्यक्ष कोणी येऊन आपलीं दुःखें सांगण्यापेक्षां प्रसंगवशात् व सहज तीं कळणें यांत विशेष स्वारस्य आहे. म्हणून मी व जेधे जेव्हां जेव्हां वेळ मिळेल, तेव्हां तेव्हां शहरांतील अगर खेड्यांतील, स्टँडवरील अगर स्टेशनवरील, गलिच्छ व गजबजलेल्या लहानमोठ्या उपाहारगृहातून जात असतों. बाजूला बसून जमलेल्या मंडळींचीं बोलणीं ऐकणें व प्रसंगविशेषीं आपण कोण आहों हें कळूं न देतां जनहिताशीं निगडित झालेल्या प्रश्नांविषयीं चर्चा करणें हाही आमचा एक उपक्रम आहे.

कांहीं महिन्यापूर्वीची गोष्ट आहे. भानुविलास थिएटरांत कुठल्या तरी कलोपासक मंडळींनीं कोणतें तरी नाटक कोटल्या तरी संस्थेच्या मदतीकरितां करण्याचें ठरविलें होतें. आणि असल्या या "सत्कार्या"ला कोणी तरी अध्यक्ष हा लागतोच. आणि हा "बहुमान" या प्रसंगानें माझ्या वांट्याला आला होता. आणि त्याचें कारण मी कांहीं साहित्यिक, कलावंत अगर नाटककार नसून थिएटराच्या मालकाचा व माझा स्नेह हेंच होतें. कलोपासकांनीं सुद्धां या निवडींत व्यवहारच साधला होता. कारण थिएटर फुकटांत मिळवण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा अंतर्यामीं मीं तेव्हांच जाणली होती. नाटक सुरू होण्याला अवकाश होता व अस्मादिकांची स्वारी अगोदरच थिएटरांत येऊन पोंचली होती. नाटक सुरू होण्यास वेळ आहे हें जाणून सदाशिव पेठेच्या हौदावरून जाणाऱ्या रस्त्यावरील एका उपाहारगृहांत मीं प्रवेश केला. हॉटेलचा मालक बहुधा उच्चवर्णीय हिंदु असावा. कारण दर्शनींच वीर सावरकरांचें चित्र टांगलेलें होतें. पुण्यांतील पश्चिम भागांतील हें उपाहारगृह असल्याकारणानें त्याचें नांव संस्कृत-भाषाप्रचुर होतें,

इतकेंच नव्हे, तर सामान्य जनाला त्याचा अर्थ कळणें अवघड होतें. थोडासा संस्कृत परिचय असल्यामुळें हें उपाहारगृह आहे हें मीं जाणलें व त्यांत प्रवेश केला. मी व माझ्याबरोबर असलेले दोघे असे आम्ही तिघे गांधी टोपीवाले होतों. कदाचित् गल्ल्याजवळ बसलेल्या इसमानें आम्हांस ओळखलें असावें किंवा कोणी तरी हें निराळें गिऱ्हाइक आहे हें समजून त्यांच्या हालचाली किंचित् अस्वस्थ झाल्या. मुद्दाम कोंपऱ्यांतील जागा आम्हीं निवडून काढली. त्या ठिकाणाहून पदार्थ तयार करण्याची जागा चांगल्या रीतीनें दिसत होती.

पोऱ्या जवळ येतांच चहाचा एक कप–" जो उत्साहकारक आहे, पण उन्मादकारी नाहीं, जो उन्हाळयांत थंडाई आणतो व हिंवाळयांत ऊब आणतो, ज्याच्या पिण्यापासून मलेरियादिक रोग पळतात व आरोग्य जवळ धांवत येतें " अशी ज्याची जाहिरात केलेली आहे– असा प्रत्येकीं एक एक मागितला. आणि त्या पोऱ्याकडे मी पाहूं लागलों. त्याच्या अंगांत प्राण गेला तरी परटाचें घर न पाहण्याचा निश्चय केलेला सदरा होता. मुळांत कोणच्या रंगाचें तें कापड होतें हें शोधणें एक संशोधनाचें कामच होतें. मुत्सद्दी जसे टीकेला दाद देत नाहीत, तद्वत् सर्व मळाला पुरून उरणारा असें त्याचें स्वरूप होतें. त्यानें घातलेली अर्धी विजार हालचालीला सोय व्हावी या दृष्टीनें केलेली असण्याऐवजीं मालकाला कमी खर्च पडण्याची सोयच त्यांत केलेली होती. त्याच्याजवळ असलेलें फडकें जें मिनिटामिनिटाला हातांतून खांद्यावर व खांद्यावरून हातांत याप्रमाणें यात्रा करीत होतें, त्याचें वर्णन करणेंच शक्य नाहीं. आंतील खोलींतून एकावर एक चहाचे कप रचून आमच्या टेबलाकडे येत असतांना मीं त्याच्याकडे सारखा पाहत होतों. त्याचबरोबर आंतल्या खोलींतली वस्तुस्थिति मला

दिसत होती. तेथील अंधार, निघणारा धूर, सर्वत्र पसरलेलीं टरफलें व तेथील काम करणाऱ्या लोकांचे वेष, अंगातून गळणारा घाम हें पाहिल्यानंतर क्षणभर तेथून निघून जावें असेंच वाटलें. पोऱ्यानें टेबलावर चहा ठेवतांच मीं त्याला त्याचें नांव विचारलें, नांवानंतर वय विचारलें, पगार विचारला, राहतोस कोठें वगैरे चौकशी केली आणि आमच्या टेबलाशीं तो नेहमीपेक्षां अधिक काळ उभा राहिलेला पाहतांच मालकाचें लक्ष सुद्धां आम्हीं वेधून घेतलें. मीं ही चौकशी चालवलेली पाहून मालकानें दुसरा नोकर, जो सुमारें पंचवीस वर्षांचा होता, त्याला तेथें धाडून आमच्या टेबलापासून त्या पोऱ्याला दूर नेण्याचा प्रयत्न केला. पोऱ्याचें वय दहा वर्षांचें होतें आणि त्यानें सांगितलेल्या हकीकतीवरून त्याला जेऊन सहा रुपये पगार होता. राहण्याची व्यवस्थाही मालकाकडेच एका हॉलमध्यें दहाबारा मुलांची–नोकरांची केलेली होती. जेवणाच्या व्यवस्थेंत हॉटेलमध्यें उरलेले सर्व पदार्थ येत असावेत असें अनुमान काढण्यास त्यानें दिलेल्या माहितीवरून प्रबळ जागा होती.

"हें पाहा, सकाळपासून तूं काय करतोस ?" मीं त्याला विचारलें.

"आम्ही सकाळीं सहा वाजतां उठतों." आणि त्यानंतर त्यानें सांगितलेली दिनचर्या व तुरुंगांतील 'क' वर्गाच्या कैद्याची दिनचर्या यांत मला कोठेंच फरक दिसला नाहीं. उलट तुरुंगांतील नियमाप्रमाणें सायंकाळीं काम बंद होतेंच; येथें मात्र रात्रीं ९ वाजेपर्यंत तर निश्चितच, पण पोलिसांची कृपा मालकावर असल्यास त्यानंतरही दोन तीन तास काम चालूच असतें. गिऱ्हाइक नसेल तेव्हां विश्रांति, एवढाच विश्रांतीचा कायदा तेथें उपलब्ध होता असें दिसून आलें. सदर्हू उपाहारगृहांत दहांपेक्षां अधिक माणसें काम करीत होतीं; तथापि तेथील कामगारांचे कामाचे तास किती असावेत, तसेंच कामगारांच्या

विश्रांतीच्या वेळा कोणत्या असाव्यात यासंबंधीं कांहीं सरकारी नियंत्रण तेथें असल्याचें दिसून आलें नाहीं.

माझ्या चौकशीमुळें मालक नाराज झाला होता, तरी सुद्धां माझी चौकशी मीं चालूच ठेविली होती. तसेंच दुसरा नोकर त्या पोऱ्याला तेथून जाण्याविषयीं सांगत होता, त्यालाही मी माहिती विचारूं लागलों. "हॉटेलच्या तपासणीला कोणी येतो का?" मीं त्या दोघांना विचारलें. "कोणी येत नाहीं" असें उत्तर मिळालें. "तुम्हां नोकरांना किती काम करावें लागतें, काय काम करावें लागतें याची चौकशी करावयाला कोणी येतें का?" "नाहीं" असेंच उत्तर मिळालें. "तुमच्या सभा कधीं होतात का? तुमचा संघ आहे का?" मीं विचारलें. दोन्ही प्रश्नांचा बोध त्यांना झाला नाहीं. संघ, सभा वगैरे काय आहे हें त्यांना माहित नाहीं हें थोरल्या नोकरानें सांगितलें. मग साहजिकच शिक्षणासंबंधीं प्रश्न विचारावे असें मला वाटलें, थोरल्यानें आपल्याला मराठी लिहितां वाचतां येतें असें सांगितलें. पण अधिक चौकशी करतां कांहीं काळापूर्वीच तें येत होतें असाच त्याचा अर्थ निघाला! आतां फक्त सही करण्यापलीकडे ज्ञान त्याच्याशीं सहकार्य करण्यास तयार नव्हतें. त्याची साक्षरता सहीची सरहद्द तोडून पलीकडे जाण्यास धजत नव्हती; त्याचें जग हॉटेल व आठपंधरा दिवसांनीं पाहण्यास मिळालेला सिनेमा एवढ्या मर्यादेंत बसलेलें होतें. आपण आहों यापेक्षां अधिक व्हावें ही अभ्युदयाची भूक त्याला नव्हती. दुसऱ्याच्या भाग्याच्या तुलनेनें आपल्या भाग्याचें घोडें पुढें ढकलावें ही ईर्ष्या त्यानें कायमची स्थगित केलेली दिसत होती. सकाळीं उठावें व संध्याकाळ, किंबहुना रात्रीं दहा अकरा वाजेपर्यंत कपबशा विसळाव्या, फडक्यानें टेबलें साफ करावींत हा त्याचा अव्याहत कार्यक्रम एखाद्या स्थितप्रज्ञा-

प्रमाणें चालू होता. तो कंठीत असलेलें जीवन त्याला असह्य वाटत होतें असेंही दिसत नव्हतें; किंबहुना जीवनाचा व्यापक हेतु काय ह्याची जाणीवच त्याला नव्हती. द्विपाद म्हणून मनुष्य असेंच त्याचें वर्णन करावें लागेल. त्यानें असें राहावें, अज्ञानांत राहावें याचें मला वाईट वाटलेंच; पण त्याहीपेक्षां अधिक वाईट जेव्हां मी त्या लहान मुलाकडे वळलों तेव्हां वाटलें. "तुला कांहीं लिहितां वाचतां येतं का ?" "नाहीं." "तूं कधीं शाळेंत गेलास का ?" "नाहीं." "तूं शाळेंत जाशील का ?" तो मुलगा मालकाकडे पाहूं लागला. "तूं इथं कसा आलास ?" "कांहीं महिन्यांपूर्वी माझे आईबाप वारले आणि चुलत्यानं मला हांकून दिलं म्हणून गांवच्या एका माणसाबरोबर इथं आलों व त्यानं मला या हॉटेलांत ठेवलं." "समज, मीं तुला फी व पुस्तकं दिलीं तर तूं शिकशील का ? तुला जन्मभर अशाच कपबशा विसळणं बरं वाटेल का ?" पुन्हा मुलगा मालकाच्या तोंडाकडे पाहूं लागला. मी त्या मुलाला म्हणालों, "मालकाचा काय संबंध आहे यांत ? तूं जर शाळेंत जात असशील, तर मालक तुला दोनतीन तास रजा देईलच व त्यानं न दिल्यास मी त्याला द्यायला लावीन. मग बोल, तूं जातोस का शाळेंत ?" त्यानें 'होय' असें उत्तर दिलें. "मग कोणची जवळची शाळा आहे इथं ?" मीं विचारलें. "कोंपऱ्यावर च्त्रिशाळा आहे ना !"

—आणि या उत्तरानें मी स्तंभित झालों ! अज्ञानाची सीमा पुण्यासारख्या पुढारलेल्या व सुविद्य नगरींत येथपर्यंत जावी हें खेदकारी आश्चर्यच आहे. पुण्यामध्यें विद्येची पारख होते असा ज्या नगरीचा लौकिक, तेथें हें अज्ञान दिसावें, पुण्यामध्यें सार्वत्रिक मोफत प्राथमिक शिक्षण असावें असें प्रतिपादणारे कार्यकर्ते असतांना पुण्यांतील सुशिक्षित भागांत हें दृश्य दिसावें, ज्या पुण्याचें "विद्यार्थी निर्माण करणारी

उद्योगनगरी ' असें वर्णन ज्या साहित्यिकानें केलें, त्याच्याच राहत्या आळींत इतकें अज्ञान असावें, खरोखर हें सर्व पुण्यांतील सर्व पक्षांच्या कार्यकर्त्यांना लाजिरवाणेंच आहे. या देशांत परकी राज्य आहे म्हणून अज्ञान आहे हें म्हणणें सर्वस्वी खरें नाहीं. दारिद्र्य व अज्ञान हे या राष्ट्राचे दोन महान् शत्रु आहेत. पैकीं अज्ञान या शत्रूचा निःपात करण्यासाठीं जेवढे प्रयत्न व्हावयास पाहिजेत तेवढे खरोखर वरच्या वर्गानें केले नाहींत. विद्येला भांडवल समजून तिला कांहीं वर्गांचीच मिरास करण्याचा आजपर्यंत प्रयत्न झाला आणि त्याही वर्गांत सर्वांच्या वांट्याला हें विद्याधन आलें असें नाहीं. आठ टक्के सुद्धां साक्षरता ज्या देशांत नाहीं, त्या देशांतील जीवन निरादर्श, निष्क्रिय व निरुत्साही राहिल्यास आश्चर्य तें कसलें ? विद्येनेंच श्रेष्ठत्त्व येतें व विद्या हें चैतन्य जर समाजाला मिळणार नाहीं, तर समाज प्रगतिविन्मुख राहील.

पुण्यांत सदाशिव पेठेंत आणि सदाशिव पेठेच्या हौदाजवळ, ज्या ठिकाणीं सरस्वतीचें निवासस्थान आहे असा दावा सांगितला जातो, अगदीं त्याच ठिकाणीं एका उच्चवर्गीय मुलानें " जवळ कोणती शाळा आहे ? " या प्रश्नाचें " चित्रशाळा आहे ना ! " असें उत्तर द्यावें यांत विडंबन तर आहेच, पण समाजांतील वस्तुस्थितिदर्शक चित्रही आहे.

# १३

## माझी पहिली व शेवटची चोरी ?

रम्य गोष्टी पाहून तसेंच मधुर स्वर ऐकून मनुष्याचें मन उत्सुक होतें व जन्मजन्मांतरींच्या जरी नसल्या, तरी भूतकालीन गोष्टी आठवतात. कांहीं आठवणी सुखकारक होतात, तर कांहीं दुःखकारक होतात. कांहीं वेळां नुसत्या आठवणी होऊनच भागत नाहीं, तर ते सर्व प्रसंग पुन्हां आपण अनुभवीत आहों असें वाटतें. मिळालेला अनुभव जमेला न धरतां त्याच चुका अगर तेंच तें वर्तन वस्तुतः नसलें तरी विचारसृष्टींत आपण करीत असतों अगर करीत जातों. मानवी मनाला साम्यानें

अगर विरोधानें चालना मिळते असें विचारशास्त्र सांगतें. ब्रह्मचारी पाहिल्याबरोबर गृहस्थाश्रमी माणसाची सृष्टि डोळ्यांपुढें उभी राहते. शूळावर चढणाऱ्या देशभक्ताबद्दल वाचल्याबरोबर देशद्रोही माणसांच्या कामगिऱ्यांचीं कृष्ण कृत्यें नजरेसमोर येतात. हंसणारें मूल पाहिल्या-बरोबर फुलांची शोभा दिसूं लागते; तसेच सुहास्यवदन पाहिल्याबरोबर कविमनाला कमलाचा भास होतो. जीं पार्थिव दृश्यें आपण पाहतों, त्यांचें प्रतिबिंब विचारसृष्टींत पडून तत्सम कल्पना काम करूं लागतात. तत्सम प्रसंग आठवतात. कुठें तरी मनाच्या सांध्याकोपऱ्यांत अडग-ळीनें पडलेले स्मृतिप्रसंग अशाच निमित्तानें जागृत होतात. भूमिगत झालेले किंबहुना दडवून ठेवलेले आनंदाचे, लज्जेचे अगर शोकाचे काष्ठवत झालेले वर्तनक्रम मानवी मन या परिस्थितींत पल्लवित करून त्यांना प्रासादिक करितें व त्यांत किती तरी काळ रममाण होतें. आनं-दाची आठवण आनंद देतो, पण दुःखाची आठवण, लज्जेची आठवण सुद्धां कांहीं कालांतरानें झाल्यास थोडी तरी मनाला सुखवीत असतेच. असें कां होतें अगर कां व्हावें हें सांगणें कठीण आहे; पण होतें हें तितकेंच खरें आहे.

### स्वयमेव संपदा

आणि अशा तऱ्हेचा एक विलक्षण व थोडी विमनस्कता उत्पन्न करणारा प्रसंग नुकताच मीं अनुभविला. मुंबई सरकारनें तुरुंगांत सुधारणा सुचविण्यासाठीं एक समिति नेमली असून मी तिचा एक ‘सन्माननीय’ सभासद आहें. आणि असल्या समितीवर काम कर-ण्याची पात्रता माझ्या अंगीं आहे असें मीं म्हटलें तर तें खास क्षम्य ठरेल. तीन प्रांतांतील मिळून १०–११ तुरुंगांतून प्रत्यक्ष ६ वर्षांवर मी राहिलों आहें; तेव्हां मी खास ‘अनुभवी’, आहें याबद्दल कोणा

शंका घेण्याचें कारण नाहीं. तसेंच तुरुंगांत असतांना काय केलें असतां काय पाहिजे तें मिळतें याचें तंत्र व मंत्र मला चांगलेच माहित आहेत असें माझ्याबरोबर राहिलेल्या 'आश्रमवासी' जनांचें मत आहे!! माझा एवढा लौकिक (!) असल्यामुळें माझ्याकडे गुणलुब्धा स्वयमेव संपदा या न्यायानें कांहीं नाहीं तरी हें सभासदत्व चालून आलें!! आणि त्याच प्रसंगानें समितीचा सभासद म्हणून परवां डिसेंबर महिन्यांत मी अन्य सभासदांबरोबर धारवाड येथील बालगुन्हेगारांची शाळा (*Borstal School*) पाहण्यास गेलों होतों.

कर्नाटकी भाषा—मोटरी

त्या दिवशीं सकाळीं क्षणाक्षणाला उत्साह वाढविणाऱ्या थंडींतून आम्ही बेळगांवाहून मोटरींतून प्रवास करून आलों होतों. कर्नाटकांतल्या मोटरीही मोठ्या आवाजानें चालतात असें ऐकलें होतें, थोडें अनुभवाला आलें होतें. मोटरींत मुंबई इलाख्याचें प्रतिबिंबच उमटलें होतें. गुजराथी, सिंधी, महाराष्ट्रीय व कर्नाटकी असे सर्व आम्हीं असून विभक्तीकरणाचा प्रश्न न चर्चितां प्रवास केला हें सांगितलें तर कांहींना आश्चर्यच वाटेल; पण तें घडलें! बाहेर थोडी थंडी तर होतीच, शिवाय शेजारीं 'सकाळ'चे बाबा त्यामुळें अधिक गारठा होईल असें जें वाटत होतें तें झालें नाहीं. रस्त्यांतील वनशोभा पाहत, बेशिस्तपणें वाढलेलें जंगल पाहत पाहत इलाख्यांतील कारागृहांना प्रासादांचें वैभव कसें प्राप्त करून द्यावें याचा विचार करीत करीत आम्ही सहीसलामत मुक्कामाला पोहोंचलों होतों. आमचा सारथी अविंध होता व त्याचें नांवही मोठें भीति उत्पन्न करणारें होतें व शिवाय भल्या पहांटेला तो नुकताच कोणाला तरी कबरस्थानांत पोहोंचवून आला होता. गाडी खड्ड्यांत घातलीन् तर एकाच वेळीं बऱ्याच

महान् पुढाऱ्यांना सद्गति (?) देण्याचें महापुण्य त्याला साधलें असतें व दुनियेंतून कांहीं काफर खत्म झाले असते. परंतु असला विचार त्याच्या पाक मनास शिवला नाहीं याचें कारण ज्या रुबाबांत मी शाही दिल्लीच्या हिंदुस्थानी याने उर्दूत बोलत होतों, तें असावें ! निदान मला तरी असें वाटतें.

## पुस्तकाची चोरी

मुख्य दरवाजाजवळ गाडी येतांच बँड सुरू झाला. पोषाखावरून उभीं असलेलीं मुलें तुरुंगांतील आहेत असें वाटत नव्हतें. किंबहुना तटबंदीशिवाय तुरुंगाला अवश्य असणाऱ्या गोष्टी बिलकुल दिसत नव्हत्या. बंदुकवाले अगर दांडकेवाले शिपाई नव्हते. मुख्य दरवाजावर 'शाळा' शब्द लिहिलेला यथार्थ वाटत होता, तटबंदींतील भागांत मुख्य दरवाजानें प्रवेश केल्यानंतर आंतील देखावा आल्हाददायक होता. बागशाही पद्धतशीर रीतीनें लावल्यानें रम्यता व रेखींवपणा यांचा मनोहर संगम झालेला दिसत होता. सामान्य तुरुंगांत दिसणारें वास्तूचें स्वरूप येथें बिलकुल दिसत नव्हतें. इकडून तिकडे वावरणाऱ्या व्यक्ति मोकळेपणें वावरतांना दिसत होत्या. अधिकाऱ्यांनीं आम्हांला निरनिराळ्या इमारतींतून चालू असलेल्या वर्गांतून नेलें. उर्दू, मराठी, कानडी, गुजराथी प्राथमिक शिक्षणाचे वर्ग पाहिले. एक इंग्रजी शिक्षणाचा वर्ग पहिला. आमच्यापैकीं कांहींनीं थोडें परीक्षकाचें कामही केलें. वर्गावरील शिक्षकांनीं आपले अनुभव सांगितले. वरिष्ट अधिकाऱ्यानें गुन्हेगारांच्या वर्गीकरणाबद्दल माहिती दिली. किती तरी मुलें सुंदर सुतारकाम, नक्षीकाम, विणकाम, शिवणकाम करतात हेंही आढळून आलें. माझें मन निराळाच विचार करीत होतें. साधारण हुशार मुलगा दिसला कीं, मी त्याची माहिती काढीं. त्याची घरची

स्थिति, त्याच्या आईबापाची वागणुक, त्याचे संगतींतील सोबती यांबद्दल विशेष चौकशी करीं. चोरी कशा परिस्थितींत केली हें जाणण्याची माझी तळमळ विशेष असे. ज्याला ज्याला आपण विचारलें त्या प्रत्येकानें आपण चोरी अगर अन्य गुन्हा केल्याचें सांगितलें व कोणीही आपणास निरपराधी म्हणून पकडलें अशी तक्रार केली नाहीं. याच्या उलट अनुभव अन्य तुरुंगांतील कैद्यांबाबत आला होता. बहुतेक पोलिसांविरुद्ध तक्रार करीत. कोणी न्यायाधीशाबद्दल. पण आपण गुन्हा केला व आपणांस योग्य शिक्षा झाली असें म्हणणारा एकही भेटला नाहीं!! या ठिकाणीं अद्यापि असत्य बोलण्याइतकी मनःप्रवृत्ति किंबहुना संवय झालेली दिसत नव्हती. कोणी संगतीमुळें, कोणी घरच्या अव्यवस्थित वातावरणामुळें बिघडलेले, वाम मार्गाला लागलेले दिसत होते. आणि ही माझी चौकशीची यात्रा चालू असतां एका तरतरीत व नीटस अशा मुलाजवळ मी आलों व त्यालाही माहिती विचारली. तो म्हणाला, “ मीं मारामारी केली नाहीं, अन्य कांहीं केलें नाहीं, फक्त ज्या घरांत आम्ही राहत होतों, त्या घराच्या मालकाच्या टेबलावरील पुस्तक मीं उचलून नेलें. नेहमीं नेहमीं तासचे तास तो तें पुस्तक पाही, फेऱ्या घाली, पुन्हा पुस्तक पाही. तास तास बाहेर जाई, पुन्हा येई. केव्हां आनंदांत, केव्हां उदासीन. तथापि पुन्हा पुस्तक पाही. व हें सर्व आमच्या जागेंतून दिसे. माझी उत्सुकता वाढली व एके दिवशीं मीं तें पुस्तक तो बाहेर गेला असें पाहून उचललें व नेलें. त्याला कळलें. त्यानें पोलिसाला कळविलें......झालें, माझ्यावर खटला झाला व मी येथें आलों आहें. ” मुलगा सर्व कांहीं सत्य सांगत नव्हता, पण पुस्तकाची चोरी निमित्तमात्र झाली, हें मात्र निश्चित होतें. पुस्तकाच्या चोरीमुळें आयुष्याचीं ३–४ वर्षें हा मुलगा येथें काढणार हा विचार माझ्या मनांत आला आणि......

राजकन्या पळवली !

—आणि माझ्या आयुष्यांतील जवळ जवळ ४० वर्षांपूर्वींच्या प्रसंगाची आठवण झाली. आमच्या राहत्या जागेपासून एका फर्लांगाच्या अंतरावर आमचे एक श्रीमंत आप्त राहत असत. त्यांचा परिवार मोठा; पांचपन्नास गडी माणसें, अनेक नोकर, कारभारी, जवळ जवळ संस्थानिकासारखा त्यांचा इतमाम होता. आम्ही नेहमीं त्यांच्याकडे जातयेत असूं. १९०८–१९०९ सालचा काळ असावा. पुण्यांतील वातावरण त्या वेळीं मोठें विलक्षण होतें. जप्त केलेलीं पुस्तकें वाचणें म्हणजे मोठा पराक्रम गणला जात होता. कुठें तरी देवळाच्या भिंतीवर इंग्रजांविरुद्ध लिहिणें अगर एखादें हस्तलिखित पत्रक जाहीर जागीं चिकटविणें म्हणजे तोरणा सर करण्यासारखें वाटे. १४–१५ वर्षांच्या वयाचीं आम्ही मुलें एकत्र जमूं. कुठें तरी गांवाबाहेर खलबतें करीत असूं. तिसऱ्या मजल्याच्या पोटमाळ्यांत बैठक मारून कांहीं तरी कल्पना काढून स्वातंत्र्य मिळविण्याचा विचार करीत असूं. कांहीं तरी विलक्षण करावें असें वाटत असे. असें वाटण्याला सुलभ असा तो काळ होता व सहज वाटेल असें वयही होतें. वर्तमानपत्रांतून राजकीय दरोडयांचीं वर्णनें वाचतांना चित्त थरारून जात होतें.निरनिराळ्या कटांच्या खटल्यांच्या हकीगतींनीं भरलेले वर्तमानपत्रांचे अंक केवळ क्षणिक महत्त्वाचे न वाटतां नोटांप्रमाणें मूल्यवान् वाटत असत व एका दृष्टीनें तें चलनही होतें.कारण आमच्या विचारांचा विनिमय त्यांच्याच साहाय्यानें होत होता. या परिस्थितींत मानसिक सृष्टि धोका न जुमानणारी, लौकिक कल्पनांना न मानणारी अशीच घडत होती आणि याच सुमारास एका सुप्रभातीं कांहीं कामानिमित्त मी आमच्या वर उल्लेखिलेल्या आप्ताच्या घरीं गेलों. मोठया दरवाजांतून गेल्यांनंतर बाजूच्या उसरीवर कारकून

बसण्याची जागा असे व तक्क्यावरील कोनाडयांतून हिशोबाच्या वह्या व इतर कागदपत्र असत. त्या दिवशीं सहज कोनाडयाकडे नजर गेली. व तेथें किंचित् रंगीबेरंगी पुठ्ठा असलेलें पुस्तक दिसलें. साहजिक उत्सुकतेनें जवळ गेलों तर ' रूपनगरची राजकन्या ' ही आपटयांची कादंबरी तेथें दिसली ! पुस्तकावर घोड्यावर स्वार झालेल्या रजपूत वीराचें चित्र होतें, त्याच्या पुढ्यांत राजकन्या बसलेली दिसत होती. आपटयांचा ' गड आला पण सिंह गेला ' त्यापूर्वी वाचला होता. ' उषःकाल 'चा कांहीं भागही वाचला होता. आपटयांची कादंबरी म्हणजे काय याची मनाला जाणीव होती. प्रसंग बांका होता. प्रलोभन न टळणारें होतें. पुस्तकावरील चित्रच प्रस्तुत प्रसंगीं कसें वागावें याची जणूं सूचनाच देत होतें ! उसरीवरील खांब मोंगल सैन्यांतील खाना-प्रमाणें दिसूं लागले. इतस्ततः वावरणारीं गडी माणसें सेनेप्रमाणें माझ्यावर चाल करून येत आहेत असा भास झाला. चित्रांतील राज-कन्या असाहाय्य नजरेनें पाहत आहे व क्षणाचा विलंब केल्यास युगाचा नाश होईल असें सूचित करीत आहे असें वाटूं लागलें. विचार कर-ण्यास वेळ नव्हता, मनांत विवेकाची लागण अद्याप झाली नव्हती. झालें ! दक्षिण हस्तानें पुस्तकाचा कबजा केला, वाम हस्तानें सदरा वर केला, क्षणांत ' रूपनगरची राजकन्या ' हृदयकपाटांत गायब झाली. तथापि अंगभूत बावळटपणाची भीति होतीच. चेहरा आयत्या वेळीं अवसानघातकीपणा करून न बोलतां फितुरी करील म्हणून मोठया-मोठयानें ' आलों ' ' आलों ' म्हणून कोणाला तरी ओ देत आहें असें भासवून उसरीवरून पुढील दालनांत व तेथून मोठ्या दरवाजांतून हा रजपूत वीर सहीसलामत पार पडला ! माझा जन्म राजपुतान्यांत झाल्या-मुळें रजपूत आहें असें मी अभिमानानें म्हणतों व वरील पराक्रम आतां ऐकल्यानंतर माझा दावा कोण अमान्य करील ?

## नको ही राजकन्या !

आणि ही आणलेली लूट आतां कोठें ठेवावी म्हणून घरीं येत असतां विवंचना सुरू झाली. थेट तिसऱ्या मजल्यावर जाऊन प्रथम अडगळींत त्या बिचाऱ्या राजकन्येला मीं निर्दयपणें टाकलें. नंतर दुपारपासून वाचायला सुरुवात करून रात्रीपर्यंत सबंध वाचून काढली. हळदीघाटचें युद्ध, सामळदासाचें स्फूर्तिदायक कवित्व, त्या रजपूत वीरांच्या पराक्रमाचीं वर्णनें वाचतां वाचतां मन बेभान झालें. पतिया लिखत है, छतिया फटत है, कमल न धरत है हाम । दुष्ट अलमगीर कपाट कमायो राखो श्री हरि लाज ॥ हा राजकन्येच्या पत्रांतील मजकूर वाचून ताडकन् उभा राहिलों. इतस्ततः पाहूं लागलों; पण कोणी नजरेस दिसेना. वाड्यांत सामसूम होतें. बाहेर रस्त्यावरही सामसूम होतें. पुस्तक संपलें. रात्रभर झोंप येईना. पुस्तकांतील प्रसंग डोळ्यांपुढें उभे राहत. थोडी झांपड येई, तर पुन्हां स्वप्नात तेच प्रसंग अधिक तीव्रतेनें येत. पण मग हळू हळू अद्भुतरम्य प्रसंग दिसेनासे झाले. रात्रीचा अंधार कमी होऊं लागला. पहांट डोकावूं लागली, तसे आपण कोणाला न विचारतां पुस्तक आणलें हें बरें झालें का, असा विचार हळूच मनांत डोकावूं लागला. आपण केलें तें चोरी नाहीं ना अशी शंका येऊं लागली. पुस्तकांतील राजकन्येनें पत्र लिहून राजाला बोलाविलें होतें. मला कोणी पुस्तक नेण्यास सांगितलें बरें ? प्रश्न उभा राहिला, पण उत्तर सुचेना व मिळेनाही. असली गोष्ट पूर्वी कधीं केली नाहीं, त्यामुळे मन अधिकच घाबरूं लागलें. उद्यां मीं नेलें हें कळलें तर, तर मग काय होईल ? वाचायला मागितलें असतें तर मिळालें नसतें का ? हे व अनेक प्रश्न सतावूं लागले. केलेलें कृत्य पराक्रमाचें मानलें तरी पुण्यकृत्य वाटेना. कांहीं तरी चुकलें असें

वाटूं लागलें. आणि एकदम पुन्हां परत नेऊन ठेवलें तर झालें कीं नाहीं हा विचार आला आणि आनंद झाला. मनावरील ओझें एकदम कमी झाल्यासारखें वाटूं लागलें. पण त्याही मार्गातल्या अडचणी दिसूं लागल्या. आणि ठेवतांना कोणीं पाहिलें तर ? आणि कोणी पकडलें तर ? नेतांना वावगें करीत आहें ही भावनाच नव्हती व आतां परत करतांना मन लंगडें झालें होतें. या स्थितींत कसें जमणार ? पुस्तकावरील चित्र आतां मार्ग दाखवीना, सामळदासांचें कवित्व स्फूर्ति देईना व राजकन्येचें पत्र आतां निर्बल ठरूं लागलें. काळ स्तब्ध नाहीं म्हणून बरें, नाहीं तर मोठी अडचण उत्पन्न झाली असती. सकाळ झाली व कांहीं वेळानें मी वाड्याच्या दरवाजापर्यंत गेलों, पण माणसें वावरत होतीं. मी परत आलों.

सुटकेचा श्वास !

चार पांच वेळां पुस्तक जेथलें तेथें ठेवण्यासाठीं गेलों; पण ठेऊं शकलों नाहीं. पुढें घरीं तसेंच राहिलें. मन दुसऱ्या गोष्टीकडे रमलें व पुढें एके दिवशीं आमच्या घरांतून ‘ रूपनगरची राजकन्या ’ अदृश्य झाली. मला बरें वाटलें. झालेली घटना विसरून गेलों व तिची आठवण पुन्हां परवां धारवाडच्या बालगुन्हेगारांच्या शाळेंत झाली. आठवण सुखवीत होती. दुखवीत होती. आतां प्राप्त झालेल्या अनुभवानें व मिळविलेल्या ज्ञानानें निरनिराळे विचार मनांत उत्पन्न झाले. लोकमान्यांनीं ज्ञानासाठीं पुस्तकें चोरणें पाप नव्हे असें वाचल्याचें आठवलें. आप्तवाक्याचा दाखला मिळाला. शिवाय गुन्हा हेतुपूर्वक असेल तरच तो गुन्हा होय असें वकिली ज्ञान सांगूं लागलें. जी वस्तु एकोपभोगी आहे; म्हणजे एकदां उपभोग घेतला की नष्ट होते, तिचा अनधिकृत उपभोग घेणें म्हणजे चोरी होईल. पण जी वस्तु बहुउपयोगी

आहे तिचा अनधिकृत उपभोग घेणें म्हणजे चोरी कशी होईल ? कारण ती वस्तु शिल्लक राहतेच. पुस्तक एकानें वाचलें, मालकाच्या परवानगी-शिवाय वाचलें तर तें कृत्य चोरी कसें होईल ? सामाजिक पार्श्वभूमि लक्षांत न घेतां एखादें कृत्य गुन्हा ठरविणें योग्य कसें ठरेल ? समोर उभे असलेल्या मुलांना खरोखर गुन्हेगार ठरवावयाचें असेल तर मी तरी का गुन्हेगार नाहीं ? ज्ञानाच्या लालसेनें केलेलें कृत्य जर गुन्हा नाहीं, तर जीवंत राहण्यासाठीं, बेकारीनें निराश झाल्यामुळें केलेलें कृत्य गुन्हा कसें ? हे व असले विचार डोक्याला सतांऊं लागले. पण खरें सांगा-वयाचें म्हणजे या विचारामुळें मला बरें वाटलें. त्या बालकाकडे आपुलकीनें पाहणें जितकें मला सुलभ झालें, तितकें माझ्या सहकाऱ्यांना खास झालें नसेल. पण कोणी सांगावें, त्यांच्यापैकीं लहानपणीं कोणी असेंच कांहीं केलें असेल तर ? एक वेळ माझी आठवण त्यांना सांगावी असें मनांत आलें; पण तेवढयांत वरिष्ट अधिकाऱ्यानें जेवणाची वेळ झाली म्हणून सांगितलें. तथापि हें गुह्यात् गुह्यतरम् मीं आज सांगून टाकळें आहे–व समाधानाचा मी आतां अनुभव घेत आहें.

१४

## कै. भुलाभाई देसाई

" प्रेम आणि जीवन यांचें आकर्षण मला निःसंशय आहे; तथापि स्वातंत्र्यासाठीं या दोहोंनाही सोडण्याला मी मागें पाहणार नाहीं."

*( Love and life have attraction for me. But for liberty I shall sacrifice both." )*

१९३२ च्या जुलै महिन्याच्या अखेरीला नाशिक तुरुंगांतील सर्व राजबंदी कांहीं निमित्तानें एकत्र आले असतां त्यांच्यापुढें कै. भुलाभाईंनीं एक भाषण करून त्याचा उपसंहार वरील शब्दांत केला.

बत्तीस सालीं नाशिक तुरुंगांत भुलाभाई व अनेक राजबंदी यांना निरनिराळया विभागांत ठेविलें होतें व त्यांना एकत्र आणण्याचे अनेक प्रयत्न अयशस्वी झाले होते. जूनच्या सुमाराला मी व आणखी दहाबारा राजबंदी नाशिक जेलमध्यें येऊन दाखल झालों व तेथें आल्यावर नाना युक्त्या करून महिन्यांतून निदान एकदां तरी एकत्र येण्याची परवानगी मिळविली आणि त्या पहिल्या प्रसंगीं भुलाभाईंनीं केलेल्या भाषणांत वरील उद्गार काढले. वर्षभर भुलाभाई आमच्याबरोबर होते. त्यांची वागणुक सर्वांशीं गोड असून त्यांनीं आपल्याबरोबर आणलेले ग्रंथ व आपल्या धंद्यांतील गतगोष्टी या आम्हांपैकीं अनेक जणांना ज्ञानाचीं व मनोरंजनाचीं साधनें ठरलीं होतीं. त्या वेळीं त्यांच्याकडे राजकारणी पुरुषांपेक्षां वकिलीच्या धंद्यांत अत्युच्च शिखर गांठलेला एक गृहस्थ याच नात्यानें आम्ही पाहत होतों.

### पंतजींची शिफारस

चौतीस सालीं निवडणुकीच्या निमित्तानें कै. भुलाभाईंचा व माझा झालेला परिचय वाढत गेला. प्रथम निकटतर असा परिचय १९२९ सालीं नवाकाळ खटल्याच्या वेळीं झाला. त्या वेळीं दिवाकरांच्या नाटय-छटेंत बोलावयाचें म्हणजे ‘ मीही त्यांत होतों. ’ त्या वेळीं कोर्टापुढील त्यांचें बचावाचें भाषण अद्यापि माझ्या कानांत घुमत आहे. निवडणुकींत त्यांचें वक्तृत्व विशेष जरी गाजलें नाहीं, तरी त्यांच्या वजनाचा फायदा व्यापारी वर्गाचीं मतें मिळविण्याच्या कामीं निःसंशय झाला. निवडणुकीनंतर ता. १८ जानेवारी १९३५ ला डॉ. अन्सारींच्या भव्य प्रासादांत असेंब्ली कॉंग्रेस पक्षाच्या सभासदांची पहिली बैठक भरली होती. कांहीं मंडळींच्या मनांतून पं. गोविंद वल्लभपंत यांना नेता निवडावें असें होतें. पंतजी शरीरानें जसे भव्य तसेच मनानें व विद्वत्ते-

नेंही भव्य आहेत. त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर न्या. मू. रानडे यांचीच आठवण होते, व न्या. मू. रानड्यांप्रमाणेंच जवळ जवळ सर्व विषयांत त्यांची पारंगतता आहे. भुलाभाईसंबंधीं कुणाचा पूर्वग्रह दूषित होता असें नव्हे, तथापि कॉंग्रेसच्या राजकारणांत ते अगदीं अलीकडील रंगरूट होते व त्यामुळें कांहींच्या मनांत किंचित् अविश्वास असला, तरी तो क्षम्य असाच होता. तथापि खुद्द पंतजींनीच भुलाभाई नेते असावेत असें सुचविल्यामुळें नेता-निवडणुकीच्या वेळीं सर्व प्रसंगीं उत्पन्न होणारे एका दृष्टीनें अत्यंत नाजुक व एका दृष्टीनें अत्यंत नाशकारी असे सर्व प्रसंग टळले.

दयितेच्या दंतव्रण

भुलाभाईनीं १९३५ पासून १९४४ अखेरपर्यंत मध्यवर्ति कायदे-मंडळांतील कॉं. पक्षाचें नेतृत्व केलें. विस्तारशः त्यांच्या नेतृत्वावर व कर्तृत्वावर अभिप्राय देणें या वेळीं अप्रस्तुत व अप्रासंगिक आहे; तथापि कांहीं गोष्टी सांगणें हेंही तितकेंच जरूरीचें आहे. त्यांच्या पहिल्या भाषणानें सर्व सभागृहाला एवढी मोहिनी घातली, कीं त्यांच्या भाषणा-नंतर कर्नल गिडने यांनीं जाहीर रीतीनें सांगितलें, कीं असें वक्तृत्व जर राउंड टेबल कॉन्फरन्सच्या वेळीं झालें असतें, तर हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाला निराळें वळण लागलें असतें. त्यांचें वक्तृत्व अत्यंत मधुर, आणि कोठें कठोरता असली तरी ती दयितेच्या दंतव्रणाइतकीच कठोर असें जर वर्णन केलें तर त्यांत अभिरुचीला बाध येईल असें मला वाटत नाहीं. आव्हानापेक्षां आवाहनानें, आवाजापेक्षां आशयानें ते श्रोतृवृंदाच्या हृदयग्रंथी उकलत असत. त्यांच्या भाषणानंतर होणारा परिणाम म्हणजे मनुष्याच्या मनाशीं अंगभूत असलेल्या सौजन्याचाच तो परिणाम असे. चर्चेला येणाऱ्या विषयांबाबत तपशीलवार तयारी

करणें असें त्यांच्याबाबत क्वचितच घडे. इतकेंच काय, पण तासतास होणाऱ्या भाषणांबाबतसुद्धां ते टिपणेंही तयार करीत नसत. पण भाषण पाहिलें तर एकामागून एक मुद्दे सुव्यवस्थित व सुसंगत असेच मांडले जात असत. वादविवादांत अनेक वेळां शब्दरचनेसंबंधीं, अन्य मुद्द्या-संबंधीं पेंचप्रसंग निर्माण होत. पण वस्तुस्थितीचें आकलन व आवश्यक असलेला अभिप्राय व्यक्त करणारी शब्दरचना या दोन गोष्टी ते इतक्या लीलेनें करीत, कीं आम्ही सर्व आश्चर्यमुग्ध होत असूं.

### कृष्णाची मुरली

प्रसिद्ध क्रिकेटपटु जॅक हॉब्स यांचें वर्णन करतांना ए. जी. गार्डिनरनें असें म्हटलें आहे, कीं 'बॅट म्हणजे हॉब्सच्या हाताचा वाढलेला भागच.' भुलाभाईबाबत थोडेंसें तसेंच होतें. सभागृहांतील त्यांचें वर्तन म्हणजे त्यांचें वाढतें व्यक्तिमत्व असेंच आम्हाला वाटावयाचें. त्यांचें भाषण व्हावयाचें आहे, असें कळलें म्हणजे प्रेक्षकांची गॅलरी, सर्व सभागृह, अधिकारी वर्ग हा मोठ्या उत्सुकतेनें हजर राही व कृष्णाच्या मुरलीप्रमाणें त्यांचें मनोहारी वक्तृत्व आकंठ पान करी.

### संयमित भांडवलवाले

भुलाभाई हे निर्दोष होते असें कोणीच म्हणूं शकणार नाहीं. जगा-मध्यें वर विनायक व खालीं संपादक याशिवाय सर्व दोषसहित आहेत. अनेक वेळां मोठमोठ्या प्रश्नासंबंधीं त्यांची विचारसरणी आमच्या दृष्टीनें चुकीची असे. आर्थिक बाबतींत त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे ते संयमित भांडवलवाले ( *Mitigated capitalism* ) या सदरांत पडत होते. त्यांचा मजूरविषयक दृष्टिकोन मूलग्राही नव्हता; तथापि सहानुभूति त्यांच्यांत संपूर्ण होती. सार्वजनिक संपाबाबत बिल

आलें असतां त्यांच्याशीं एक तासभर मला झगडा करावा लागला, तो इतका कीं ते थोडे रागानें म्हणाले, '*You are arguing as if you are arguing before a judge.*' मी म्हणालों, "तुम्हीं कांहींही म्हणा, पण मी म्हणतों तें आजपर्यंतच्या काँग्रेसच्या धोरणाला धरून आहे." त्यांनीं बापूजी अणे यांचा सल्ला घेतला, व माझें म्हणणें मान्य केलें आणि हीच वृत्ति त्यांच्यांत विशेष होती. पुढारीगिरी गाजवावयाची अथवा लादावयाची ही वृत्ति त्यांच्यात नव्हती व त्याचमुळें उत्पन्न होणारे गुण व दोष या दोन्हींचेही ते एक उत्कृष्ट उदाहरण होते. आपल्यांत व आपल्या अनुयायांत केव्हांही मतभेद उत्पन्न झाला असतांना ते अणे यांचा सल्ला घेत व पुष्कळ वेळां त्याप्रमाणें वागत ही खरोखरच उल्लेखनीय गोष्ट आहे.

### राजकारण-जीवनाचा खेळ

सुरुवातीला सभागृहांतील जय व पराजय हे त्यांना आनंदवीत व दुखवीत असत. जी स्थितप्रज्ञता या बाबतींत पंत, सत्यमूर्ति यांच्यांत होती, ती सुरुवातीला भुलाभाईंत नव्हती. क्वेट्टा धरणीकंपाच्या तहकुबीच्या सूचनेवर आमचा दोन मतांनीं पराभव झाला. नंतर आम्हीं आमच्या पक्षकचेरींत आलों व कितीतरी वेळ ते दुःखीकष्टी झालेले दिसत होते. झालेला पराभव त्यांना झोंबत होता. पण सत्यमूर्तींनीं तेव्हां, पार्लमेंटरी जीवनांत, जसे कोर्टांत वकील वागतात त्याच स्थितप्रज्ञ वृत्तीनें वागलें पाहिजे असें सांगून पुढील दिवसाच्या कामाबद्दल चर्चा सुरू केली, त्या वेळीं भुलाभाईंनीं 'राजकारण म्हणजे वकिली नव्हे, जीवनाचा खेळ आहे' असे अर्थपूर्ण उद्गार काढले.

' चूक झाली खरी '

त्यांचा स्वभाव आपल्या सहकाऱ्यांबाबत अतिशय प्रेमळ असाच होता. आम्ही सर्व एका कुटुंबांतील आहों *(we are one family)* असें ते म्हणत व वागतही. पक्षाच्या कचेरीचा मोठा हिस्सा त्यांच्याच खिशांतून येई. त्यांचे व अनुयायांचे संबंध स्नेहाचे व सहकार्याचे असले, तरी प्रसंगीं खटकेही उडत. एक प्रसंग मला आठवतो व तो म्हणजे विमा कायद्याच्या चर्चेंत पक्षाच्या निर्णयाला थोडीशी सोडून त्यांनीं मांडलेली भूमिका हा होय. त्यांनीं भूमिका मांडल्याबरोबर पक्षांत एकदम नाराजी उत्पन्न झाली व या घटनेचा विचार करण्यासंबंधी भरलेल्या सभेंत त्यांनीं उभे राहून सांगितलें,

" *I do not plead justification. I have made a mistake. If you have confidence in me, I continue your leader or I wish to stand aside.*" ( मीं चूक केली आहे, तुमचा विश्वास असेल तर तुमचा नेता राहतों, नाहीं तर बाजूला होतों. ) व लागलेच त्यांच्या डोळयांत अश्रु उभे राहिले व ते खालीं बसले. दोन मिनिटेंपर्यंत सभेत स्तब्धता होती. नंतर मी म्हणालों, " लोकशाही नेतृत्व कसें असावें याचा उत्कृष्ट धडा तुम्हीं आम्हांपुढें मांडला आहे. आमचा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे, व जें झालें तें दप्तरदाखल व्हावें. " माझी सूचना एकमतानें मंजूर झाली व पक्षाच्या निर्णयाप्रमाणेंच विमाकायद्यांत दुरुस्त्या झाल्या.

विश्वासू पक्षनेता

दुसऱ्या एका नाजुक प्रसंगीं ज्यांत त्यांच्या वैयक्तिक वर्तनाचाच भाग होता असा पेंचप्रसंग निर्माण झाला होता. त्या वेळीं त्यांच्याविरुद्ध काहूर उठलें होतें. त्यांनीं पक्षापुढें बोलतांना असे उद्गार काढले

कीं ' मी जर बरोबर असेन, तर तुम्ही माझ्यामागें यालच, पण तुमच्या निष्ठेची कसोटी मीं चुकलों असेन त्या वेळींही माझ्यामागें येण्यांतच आहे. ' अर्थात् पक्षानें ही कसोटी मान्य केली नाहीं; कारण प्रस्तुत चूक वैयक्तिक वर्तनाबाबत होती. असे दहा वर्षांतील किरकोळ प्रसंग सोडले असतां त्यांच्यावर असलेला पक्षाचा विश्वास शंभर टक्के होता. त्यांचे स्नेहसंबंध अबाधित होते. आणि मध्यंतरींच्या कांहीं अप्रिय घटना घडल्या नसत्या, तर याही खेपेस तेच नेते झाले असते याबद्दल मला शंका नाहीं.

प्रतिकूल परिस्थितीचा बळी

तुरुंगांतील माणसांचीं मतें व बाहेरच्या माणसांचे त्यांचा- यांच्या-बद्दल पक्षनिष्ठ दृष्टीनें जो अपप्रचार झाला त्याचाच परिणाम भुला-भाईंच्या राजकारणी जीवनावर झाला हें उघड आहे. आय्. एन्. ए.च्या खटल्यांत त्यांनीं केलेली देशसेवा व वकिलींत दाखविलेलें नैपुण्य, बचावाच्या कामीं व्यक्त केलेली अलौकिक व आंतरराष्ट्रीय अशी उच्च व नीतियुक्त भूमिका या सर्व गोष्टी ताज्या इतिहासांतील आहेत. भुलाभाई हे क्रांतिकारक नाहींत म्हणून त्यांना नांवें ठेवणें हें अयोग्य आहे; कारण तसा दावा त्यांनीं कधींच केलेला नाहीं. प्रयत्नांची पूर्तता सत्ताप्राप्तीनें अथवा अधिकारप्राप्तीनें पाश्चात्य देशांत होते. अधिकार-प्राप्ति म्हणजेच मनुष्यांतील विधायक कर्तृत्वाला मिळालेली संधि होय. गेल्या पन्नास वर्षांचा या देशाचा इतिहास म्हणजे क्रांतिवृत्तीचीं नव्हेत, पण कर्तृत्ववान अशीं अनेक माणसें त्यांच्या विधायक वृत्तींना वाव न मिळाल्यामुळें मातीमोल व्हावींत, असाच आहे. भुलाभाईसारख्या माणसाला वर्षोनुवर्ष लायकीची जाणीव असून, गुणांची मान्यता मिळाली असूनसुद्धां सरकारविरोधी पक्षांत काम करावें लागलें ही दुर्दैवी

घटना आहे. विधायक वृत्तीच्या व कर्तृत्ववान माणसांना सत्ता नाहीं व जीं माणसें क्रांतीच्या प्रवृत्तीचीं आहेत त्यांना पसंत नसलेल्या विधायक कार्यक्रमाला तीं लावलीं जातात या दोन्ही गोष्टी या देशांत एकाच वेळीं घडून येत आहेत! भुलाभाई अधिक काळ वांचले असते, तर त्यांनीं अधिक कामगिरी केली असती यांत शंका नाहीं. त्यांच्या मृत्यूनें
एक उत्कृष्ट वकील, एक उत्तम नागरिक व एक प्रामाणिक कार्यकर्ता नाहींसा झाला आणि व्यक्तिशः बोलावयाचें तर एक थोरला भाऊच नाहींसा झाला असें आम्हांपैकीं कित्येकांना वाटतें.

## १५

## बाजपाळणा विणायचा आहे का बाजपाळणा ?

मनांतल्या मनांत येणाऱ्या कल्पनांचा सुद्धां खुद्द मनावर परिणाम होतो. एखादा आनंददायक विचार आला कीं लागलेंच मन प्रसन्न होतें, तर दुःखद विचार आला कीं मन उदास होतें. मनांतले विचार मनच ऐकत असतें व त्यामुळें होणारे परिणाम अनुभवीत असतें. आणि जेव्हां मनांतले विचार भाषेच्या द्वारा बाहेर पडतात तेव्हां बोलणाराही ते ऐकतो व ऐकणाराही ऐकतो. मनुष्यानें स्वतः जरी एकांतांत बडबड केली अगर आरशासमोर उभें राहून थोडें तोंड

वेडेंवांकडें करून जरी एखाद दुसरा शब्द उच्चारला, तरी स्वतः तो श्रोता असतोच व त्याच्याच शब्दाचा परिणाम त्याच्यावर, त्याच्या मनावर होत असतो. शब्दाचा खुद्द बोलणारावर परिणाम होतो तसाच ऐकणारावर होत असतो व तो कांहींना कांहीं तरी झालाच पाहिजे हेंही सरळ आहे. हा परिणाम किती होतो, कसा होतो व कशा तऱ्हेनें होतो हें ऐकणाराच्या परिस्थितीवर अवलंबून राहतें. बोलणारा बोलून जातो, पुष्कळ वेळां त्याच्यासमोर श्रोते आहेत हें त्याला माहितही नसतें, किंबहुना अमुक व्यक्तीला उद्देशून तो बोलत असतो असेंही नाहीं. कित्येक गोष्टी केवळ सामाजिक परंपरेनें अगर संकेतानें बोलल्या जातात. सकाळीं वासुदेव फेर धरून गातो. ऐकणाराची मनःस्थिति असेल तसे विचार गाण्यामुळें उत्पन्न होतात. रात्रीं फकीर दोहेगान गातो. त्यांतील विचारांना कांहीं श्रोत्यांच्या मनांत जाब मिळतो, तर कांहींच्यावर तें परिणामही करीत नाहीं. सकाळपासून रात्रीपर्यंत आरडत ओरडत जाणारांची, कवनें-काव्यें म्हणत जाणारांची, निरनिराळे पदार्थ अगर सोयीविषयक घोषवाक्यें ओरडून आळींतून संचार करणारांची खानेसुमारी केली, तर जीवनाची विविधता किती आहे हें कळून येईल. प्रत्येक कवन, प्रत्येक घोषवाक्य समाजांतील एका एका पैलूचें प्रतिबिंब असतें, समाजांतील चालीरीति त्यांत सामावलेल्या असतात. समाजांतील सुखदुःखांचे हिशोब कोणी त्यांतून काढूं लागला तर तें चुकीचें होणार नाहीं. इतकेंच काय, आध्यात्मिक भाव समाजात कसा आहे हेंही त्यांतून कळून येतें. शब्दांत केवढी शक्ति आहे. उपनिषदांत ब्रह्म शब्दस्वरूप आहे, असें सांगितलें आहे. शब्दानें अंतःकरणापासून डोंगरापर्यंत सर्व सूक्ष्म व सर्व जड वस्तूंना व भावांना छेदण्याचें सामर्थ्य आहे-आणि सर्वांना जोडण्याचेंही सामर्थ्य आहे. आशा व निराशा उत्पन्न करणारा, सुख व दुःख दोघांनाही प्रसवणारा, हा महान्

शक्तिमान् शब्द पुष्कळ वेळां एकाच व्यक्तीच्या मनांत दोन्ही भाव एकदमही उत्पन्न करतो.

आणि हा अनुभव विचित्र, पण कुतूहल उत्पन्न करणारा असाच असतो. वास्तविक आमच्या आळींतून दररोज सकाळीं आठनऊचे सुमारास 'बाजपाळणा विणायचा आहे का बाजपाळणा ?' असें ओरडत जाणारा वृद्ध हरिजन कांहीं जगाविरुद्ध करतो आहे असें नाहीं. जगरहाटीप्रमाणें पुण्यासारख्या अफाट शहरांत पांचपन्नास प्राणी दररोज जन्मास येत असतात व म्हणूनच या वृद्ध हरिजनाचें सामाजिक जीवनांत स्थान आहे व तो जेव्हां वरील घोषणा करीत असतो, त्या वेळीं तो आपलें नित्यकर्मच करीत असतो. मला आठवतें तेव्हांपासून हा त्याचा नित्यक्रम चालूच आहे. जन्माला येणाऱ्या बालकांची सोय करणारा, जगावर एका दृष्टीनें अनंत उपकार करणारा हा पुण्यपुरुष कांहीं अजरामर नाहीं. किंबहुना क्षणाक्षणाला हाही मृत्युपंथें मार्गक्रमण करीतच आहे. एवढें पुणें शहर अफाट पण दिवसाच्या उद्योगाची सुरुवात तो आमच्या पेठेपासून करतो व त्याचें कारणही माझ्या मते तसेंच महत्त्वाचें आहे. आमची आळी म्हणजे स्मशानसंन्निधभूमि आहे. आमचा शेजार म्हणजे मृत्यूचा शेजार आहे. केव्हांही रात्रीं गॅसची बत्ती दिसली कीं नक्कीच ती अंधारांत मार्गदर्शन करून जीवनाच्या सरहद्दीकडे जाणाराची सोय करीत आहे, असेंच आढळून येईल. कीर्तीचे सर्व रस्ते अखेर स्मशानांत विराम पावतात ! श्रीमंत, गुणवंत, भाग्यवंत, तसेच दुःखी, दरिद्री, करंटे सर्व आमच्या आळींतील स्मशानघाटावर इच्छा असो नसो, समतावादी होतात. अगर केले जातात. पुण्यांतील सर्व रस्त्यांचा अंत आणि या दृष्टीनें याच पवित्र भूमींत होतो. आणि नेमका हा वृद्ध हरिजन नदी ओलांडून याच वस्तीपासून आपल्या नित्य उद्योगाला प्रारंभ करतो. जातस्यहि

ध्रुवो मृत्यु ध्रुवं जन्म मृतस्यच हेंच आपल्या पोषवाक्यांनीं जणूं कांहीं समाजाला त्याला सांगावयाचें आहे असें वाटतें. व्यक्ति आली आणि गेली; मानवी जीवनाचा प्रवाह अखंड आहे. यात्रेकरू येतील आणि जातील, पण मार्ग कायम आहे. आणि मानवी जीवन चालू आहे तोंपर्यंत आमच्या वृद्ध हरिजनाचें काम चालूच राहणार. त्याची दैनंदिन फेरी ही अशी चालू राहणार. तो जाईल, त्याच्या मागून येणारा त्याच्या कर्माचा वारस तेंच करीत राहील हें उघड आहे. त्याचें कार्य अखंड व अजरामर, मानवी जीवनही अखंड व अजरामर आणि म्हणूनच समाजांतील व्यक्तीच्या मनातील भाव असेच अखंड, असेच अजरामर असतात. आपण मरणार, आज नाहीं उद्यां जाणार, पण आपल्यामागें कुणी तरी आपला असावा, पिंडोदक-क्रियेसाठी असावा, असें धर्मशास्त्र म्हणत असलें, तरी मानवी मन तो निराळ्या दृष्टीनें असावा असेंच म्हणत असतें. भोगेच्छेला पुनित करणारी ही भावना आहे. अपत्यलालसा ही नित्याचा अनित्यावर विजय दाखविणारी, पार्थिव गोष्टींत उत्पन्न होऊन अपार्थिव व आध्यात्मिक उन्नतीला कारणीभूत होणारी एक महान् शक्ति आहे. निःस्वार्थतेची कमाल मर्यादा गांठण्यास उत्तेजन देणारी ती एक प्रेरणा आहे.

आणि असें जर नसतें, तर आमच्या आळींतील कौपऱ्यावर राहणाऱ्या महाश्वेतेला मीं मनांत कधींच आदराचें स्थान दिलें नसतें. मी त्या कुलवधूला महाश्वेता म्हणतों याचें कारण ती केवळ शुभ्रवस्त्र नेसते एवढेंच नव्हे, तर तिचे विचार, तिचे आचारही तसेच पवित्र आहेत. सुमारें पावशतक झालें.मोठ्या थाटानें निघालेल्या वरातींत तिला लोकांनीं प्रथम पाहिलें. त्या वेळीं ‘ दशदोषविवर्जिता ’ अशीच नववधू म्हणून ती आमच्या आळींत आली व गृहिणी झाली. लहानमोठ्या घरच्या माणसांना ती प्रिय झाली. एवढेंच नव्हे, तर शेजारीपाजारी पण तिला

नांवाजूं लागले. वर्षांमागून वर्षें गेलीं, वृद्ध सासू, वृद्ध सासरा संसाराचा भार तिच्यावर टाकून दूर, हा लोक सोडून गेले. थोडे दुःखीच होते ते शेवटीं शेवटीं. कारण नातवंडाचें सुख त्यांना लाभलें नाहीं. मोठी संपत्ति, मोठा लौकिक पण वारस नाहीं, याची जाणीव चालू पिढींतील दंपत्यास होऊं लागली. आणि दररोज ही जाणीव करून देण्याचें काम वृद्ध हरिजन आपल्या घोषणेनें करीत होता व अजूनही करीत आहे. जेव्हां जेव्हां सकाळीं पायांत फाटका तुटका जोडा, कमरेला मळकें धोतर, चिंध्या झालेलें मुंडासें व खांद्यावर टाकलेले काश्याचे सुंभ, या थाटांत हा आमच्या दारावरून 'बाजपाळणा विणायचा आहे का बाजपाळणा ?' ओरडत जातो, त्या वेळीं, अगदीं त्याला एकशें चवेचाळीस कलम लावून बंदी करण्याचा मोह मला होतो. आतांपर्यंत दहा बारा वेळां त्याला आमच्या वास्तूंत काम करण्याची संधि दिली, तरी हा हावरा पुन्हा आमची गिऱ्हाइकी मागतो याचा अर्थ काय ! ! पण राजकारणाचे धक्केचपेटे खाऊन, जगांतील अनेक अनुभव घेऊन मी अगदीं विवेकी बनलों आहें. आणि हा कबुलीजबाब 'प्रभावी नेतृत्वा'स जरी नालायक ठरवीत असला, तरी 'विधायक कार्या'ला माझी उपयुक्तता पटवील अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. एवढी गोष्ट खरी कीं, मी त्यावर धांवून जात नाहीं. आणि मी तरी धांवून जाऊन काय करणार ? समर्थी सामर्थ्य धरणें हें जसें देणें ईश्वराचें, तसेंच संतान पोटीं येणें हें तरी ईश्वराचें देणें आहे अशी मी अनुभवानें समजूत करून घेतली आहे ! जगांतील वैषम्य व नैर्घृण्य पाहून एखाद्या चार्वाकाला ईश्वर जगाचें कारण नाहीं असें वाटेल, तर त्याच कारणासाठीं तोच जगाचें कारण आहे असें इतरांना वाटेल. अपमार्गानें, आडमार्गानें मिळवलेली संपत्ति देवाची व देवाची देणगी म्हणून समाज मानतोच कीं ! आणि दारिद्र्य व कष्टही त्याच न्यायानें समाज सहन

करण्यास शिकवितो. आणि ही आमच्या समाजाची शिकवण जीवनाची नैतिक प्रतिष्ठा आहे. यामुळें समाजांतील संघर्ष कमी होऊन, वैषम्यांत समाधान मानणें विवेक समजला जातो. आणि म्हणून पोटीं संतान नसतांना सुद्धां इतरांच्या मुलांना आपलीं मुलें समजून वागणारी स्त्री समाजांत एक उन्नत वातावरण निर्माण करीत असते. दररोज सकाळीं हा वृद्ध समाजसेवक आपल्या घोषवाक्यांनीं आयुष्यांतील वर्म, जीवनांतील अपुरेपणा, मनांत खोल रुजलेलें दुःख ठळकपणें नेत्रांपुढें उभें करीत असतां शांत चित्तानें तें पाहावयाचें व श्रवण करावयाचें ही कांहीं साधी गोष्ट नाहीं. स्त्रीला वांझपण यापरतें परम दुःख नाहीं! आणि यामुळें आपण समाजाचें ऋण फेडूं शकत नाहीं इतकें ज्ञान असणाऱ्या स्त्रीला तर हें जीवन क्षणाक्षणाचें मरण वाटत असतें. आपले गुणच नाहीं, तर पुष्कळ वेळां आपले दोषसुद्धां आपल्या संतानांत पाहण्यांत आईबापांना एक सूक्ष्म आनंद वाटत असतो. कां वाटतो हें कोण सांगणार? व कोणत्या शब्दांत सांगणार? मातृत्वानें स्त्रीजीवनाला पूर्णत्व येतें व पराक्रमानें पुरुषार्थ सिद्ध होतो. राष्ट्रांतील पराक्रम, स्वार्थत्याग, धैर्य या सर्व गोष्टींना युद्धामुळें वाव मिळाला म्हणून राष्ट्राच्या पूर्ण विकासासाठीं युद्धाची आवश्यकता आहे असें मुसोलिनी सांगे, व स्त्रियांच्या बाबतींत त्यांच्या सद्‌गुणांचा विकास होण्यासाठीं मातृत्वाची आवश्यकता आहे असें तो म्हणे. आज इंग्लंडमध्यें दोन लाख प्रौढ कुमारी असून त्यामुळें एक मोठा सामाजिक प्रश्न निर्माण झाला आहे. लग्न नाहीं आणि लग्न हें ज्या सुखाचें, ज्या पूर्णत्वाचें कारण आहे, तें अपत्यसुख नाहीं, यामुळें या कुमारिकांचीं जीवनें अस्थिर व भ्रांत झालेलीं आहेत. मोठ्या प्रमाणांत सामाजिक जीवनांत असमाधान वावरणें धोक्याचें आहे. प्राप्त परिस्थिति दैवायत्त म्हणून समाधान मानण्यास सांगणारा वेदांत तेथें नाहीं. दैववाद प्रयत्नविन्मुख करणारा

खरा, पण जीवनाच्या कांहीं दालनांत त्याला थोडा वाव दिला तर कांहीं सामाजिक नुकसान होईल असें नाहीं.

आणि अशा दैववादावर नितांत विश्वास ठेवून धीरगंभीरपणें जीवनपथ आक्रमण करणाऱ्या या भगिनीकडे पाहिलें म्हणजे माझें मन नम्र होतें. दररोज ती आपल्या घराच्या सज्जांत नेमकी आठनऊचे सुमारास येते व अगदीं गौरीहराला बसलें असतांना जी उत्सुकता, जी गोड हुरहुर वधूच्या मनांत असते, अगदीं त्याच उत्सुकेतेनें ती त्या वृद्ध हरिजनाची वाट पाहते. सूर्य उगवावयाचा एखादे दिवशीं विसरेल, पण ती पुण्यास असल्यास सज्जांत येण्यास कधींही विसरणार नाहीं. तो रस्त्यानें येत असतो. 'बाजपाळणा विणायचा आहे का बाजपाळणा ?' असें दर मिनिटाआड म्हणत असतो. दृष्टिपथांत आल्यापासून दृष्टि-पथाबाहेर जाईपर्यंत अनिमिष नेत्रांनीं त्याला पाहत, श्रुतिपथांत आल्यापासून श्रुतिपथाबाहेर जाईपर्यंत त्याचे तेच ते शब्द कान लावून ऐकत उभी राहणाऱ्या या भगिनीचें दृश्य मी वर्षंन वर्षे पाहत आहें. माझी खात्री आहे कीं, एक दिवस जर हें घडून आलें नाहीं तर तो दिवस तिला दुर्दिन वाटत असला पाहिजे. दिवसभर चुकल्या-चुकल्यासारखें वाटत असलें पाहिजे. जखमेला जरा धक्का लागला तर दुःख होतें, पण त्याबरोबर थोडें बरेंही वाटतें ! हरिजनाचे शब्द कानावर पडतांच तिच्या मनांत काय भावना उमटत असतील ? काय विचार येत असतील ? दुःखाचे, मत्सराचे, असमाधानाचे का अन्य ? शेजारचीं मुलें जेव्हां तिजकडे येतात व जेव्हां जेव्हां 'आई' शब्द ते उच्चारीत असतील, तेव्हां तेव्हां काय तिला वाटत असेल ? कोणी तरी या शब्दानें आपल्याला हांक मारावी असें तिला वाटत नसेल का ? मनांतल्या भावनांना आज नाहीं उद्यां योग्य शब्द सांपडतो; निदान, वेडयावांकडया शब्दांत त्या भावना उमटतात. पण

शब्द असून त्यांत अर्थ नाहीं, असेंच नाहीं कां तिचें जीवन ! अपत्य-हीन स्त्रीजीवन म्हणजे अर्थहीन शब्द! आशयाशिवाय आवाज व स्वररहित संगीत हेंच खरें. आपण आहोंत. मुलें आहेत. पण ' आई ' हा शब्द—जो किमयेप्रमाणें दुःखाचें सुख करील, वैराण मुलुख गुलजार करील, मलिनतेला घालवून मांगल्य उत्पन्न करील तो उच्चारला जात नाहीं हा केवढा दैवदुर्विपाक ! आणि जेव्हां आपलें न्यूनत्व दाखविणारे विचार मनांत गर्दी करीत तिला सतावीत असतील, त्या वेळीं ती त्या उत्पन्न झालेल्या भावनांना कशी वाट देत असेल ? भावी आशेचें प्रलोभन दाखवून, का अन्य रीतीनें ? अद्यापि आशा तिच्या मनांत शिल्लक राहिलीच, तर आशेनें अनुभवावर विजय मिळविला असेंच म्हटलें पाहिजे ! नाहीं, मला असें वाटत नाहीं. ज्या समाधानी वृत्तीनें ती दिवसभर वागते, जगांतील व्यवहाराकडे पाहते, त्यावरून तिनें आपली दृष्टि अधिक सामाजिक करून अधिक प्रगल्भ करून आपलें वैयक्तिक न्यून नाहींसें करून टाकलें आहे. स्वतःचें जीवन व्यापक केल्यानें निर्दोष होऊन ती अधिक मनोज्ञ झालेली आहे. बारशाला हजर राहण्याइतका आनंद तिला अन्यत्र वाटत नाहीं. बाळंतविडया-इतकी दुसरी उदात्त व पुण्यकारक देणगी तिच्या मतें नाहीं. आळींतील सर्व मातांमध्यें जिनें आपलें मातृत्व पाहिलें, ती जगन्माताच नव्हे का ? मत्सरहीन जीवन, इतकें समाधानी जीवन गांधारीलाही प्राप्त झालें नसेल ! आणि या सर्वांचें निमित्तकारण कां होईना, आमचा वृद्ध हरिजन आणि त्याला साधी वाटणारी पण अनेक जीवांवर अनेक तऱ्हेनें परिणाम करणारी त्याची घोषणा ' बाजपाळणा विणायचा आहे का, बाजपाळणा ? ' हेंच नाहीं का ?